


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

साहित्य • कला • संगम

वर्ष २३ वे .
मूल्य १।। रु.


## ऑगस्ट स्मृति : कथा विशेषांक

### श्रे य ना मा व लि–



"गंधर्व" न अमुचे गेले, "गंधर्व"च गातचि बसले....नटसम्राट बालगंधर्व यांना दीपावलीने वाहिलेली भावपूर्ण श्रद्धांजलि ● चक्र दिवसाचे, युगाचे––असे हे रहाटगाडगे....**मधुकर** ● मराठी माणूस मार कां खातो ?–सामाजिक विश्लेषण....**पु. रा. बेहेरे** ● तेजाची बाळे–स्फूर्तिदायक ऐतिहासिक कथा...**प्रभाकर शेणई** ● हिचकॉकची घंटा–प्रेमाचा जीवघेणा भोवरा....**उत्तम शिरवळकर** ● गीत माझे मूक झाले–ध्यासकथा....**प्रभाकर अत्रे** ● ऑफीस–भावनांची गुंतागुंत....**सिनिक्** ● मवाली–संभ्रम कथा...**सौ. सुनीता देवधर** ● डागळलेली कैरी–ग्रामीण जीवनातील एक दर्द....**द. स. काकडे** ● मराठी माणसा, अंतर्मुख हो!– कां, कशासाठी ?...**म. शा. दाबके** ● दर्द कहाँ, इलाज कहाँ ?–चोराचीहि पारख चुकावी, अं!....**पंढरीनाथ रेगे** ● सोविएत चित्रपट–एक झलक...**प्र. श्री. नेरुरकर** शिवाय ऐसी अक्षरे....अशा झुंजा, असे झुंजार–अरविंद ताटके आणि रुक्मिणी–प्रा. विलास चाफेकर, रंगमंच, सन्मान पुष्पे, दीपमाला, वात्रटिका....रेशमी चिमटे....खमंग मासले आणि

**वीस वर्षातील आमच्यामध्ये सर्व (!) दिशेने घडलेल्या क्रांतीचे चित्रविचित्र दर्शन !!**


Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किमत १।। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२।।. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मते असतातच असे नाही.



**Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57**
**DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay - 4.**





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# क्रांतीच्या पावलांची चाहूल ?

खंडित स्वरुपात का होईना पण भारत स्वतंत्र झाल्यास एकविसावे वर्ष सुरू होत आहे. एका अर्थाने स्वतंत्र भारत किशोरावस्था ओलांडून तारुण्यात पदार्पण करीत आहे. जगाचे आव्हान स्वीकारण्यासाठी निधडी छाती, पोलादी स्नायू व खंबीर मनोभूमिका यांच्या पूर्वतयारीचे तेज त्याच्या चेहेऱ्यावर विलसावयाला हवे होते. . . . पण

गेल्या वीस वर्षांतील सर्वांगीण राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय घडामोडीत भारत घसरतच चालला आहे. कारण एकच. राष्ट्रीय हिताची सुस्पष्ट कल्पना आम्हाला ऐकावीशी वाटत नाही, सांगावीशी वाटत नाही. तिला मूर्त स्वरुप देण्यासाठी झटावे असे वेडगळ विचार तर डोळ्यात निर्माण सुद्धा होत नाहीत. कां व्हावेत ? ते घडले तर मंत्र्यांच्या बंगल्यातील टेलिफोनची बिले हजारोनी कशी होतील, शीतवातानुकुलीत यंत्रसामग्रीचे उत्पादन करणाऱ्या देशी-परदेशी कामगारांचे पोट कसे भरेल ? बिच्चारा चीन. आमच्याहून दुप्पट लोकसंख्या पण वीस टक्क्यापेक्षा कमीच जमीन भात शेतीला उपयोगी. त्याना नको का जिवंत ठेवावयाला? म्हणून तर तिबेटची वतनवाडी त्याना देऊन टाकली. उत्तर-पूर्व सीमेवरील हजारो चौरस मैलांचा टापू दिला. नि अगदी अलिकडे त्याने मारलेल्या चापटचाही लाडे लाडे रागावत सहन केल्या. तसाच तो अय्यूब नि त्याचे लष्कर. हाजी पीर कारगिलची मजा त्यानी तरी कधी चाखावयाची ? तिकडे तो नासेर. अरे, रशियाच्या हाताला हात लावून मम म्हणायचे ते भारताने नाहीतर काय अमेरिकेने !

बिहारमधील दुष्काळ – चालायचेच हो. नाही तरी त्यामुळे संततिनियमन आपोआपच होते की ! बंगालमधले घेराव, त्यांचा थयथयाट नुसता पहातच रहावा इतका विलोभनीय, मोहिनी घालणारा वाटतो. इकडे महाराष्ट्रात तरी काय ? अहो तामीळनाड व केरळमध्ये धान्य कमी पिकते व रक्तमय क्रांतीची समाजवादाची लागण भलतीच होते. 'हायब्रीड' यशस्वी करण्यासाठी ते बेणे महाराष्ट्रात रुजविलेच पाहिजे. त्याला जगविण्यासाठी पांढऱ्या टोपीचे समाजवादी तसेच ते लाल टोपीवालेही हातात सं. म. समितीची गळती झारी घेऊन पाणी शिपण्यास तयार आहेतच की! उद्योगपती व भांडवलवाले हे तर बोलून चालून लाभ आणि लोभाचे राजरोस ठेकेदार. ज्याचे शीड फुगले ते तारु आपले. कधी कामगार नेत्यांना गोंजारून तर कधी सरकारच्या आड दडून आपली पोळी पिकविणे, हा त्यांचा धंदा. त्यातला एकादा चतकोर, नितकोर तुकडा संशोधन, शैक्षणिक, सामाजिक कार्यासाठी दिला की पब्लिक पुन्हा खुष. सांगायचे तात्पर्य एवढेच की, आम्ही कामगार, मालक तथाकथित बुद्धिजीवी सर्वच आपल्यात गुंग आहोत. नि त्या गुंगीमुळे वर्गकलहाची, रक्तपाताची पावले वाजत असूनही त्याची चाहूल घेण्याची आमची तयारी नाही. शासनाचे काय विचारता ? मृत्यूशय्येवर पडलेल्या पेन्शनर किंवा स्वातंत्र्यवीराला पावतीवर सही करण्याचे त्राण नाही म्हणून त्याला यमराजाचे हाती सोपवून प्रघात, पायंडे, जी. आर. नो जबाबवारी याच काथ्याकुटात स्वार्थाचे विडे खलून खाणे याचेच नांव शासन, अशी भारतातील शहाणी समजूत आहे. ही शहाणीच. कारण त्यांचे शास्ते आम्हीच अक्कल हुशारीने नशापाणी न करता निवडून दिले आहेत.

हे चित्र पालटलेच पाहिजे. तेही आपणच. शंभर टक्के, सर्व दृष्टचा भारतीय म्हणविणाऱ्या लोकानीच त्यासाठी घाम, रक्त आणि श्रम दिले पाहिजे. नि तेही जाणत्याला; राष्ट्रीय सद्‌गुण, प्रवृत्ती, राष्ट्राभिमान यांची जोपासना करणाऱ्या राष्ट्रीय कार्यकर्त्यांना, त्यांच्या पक्षाचे लेबल न बघता. तरच ती रक्तमय, विनाशकारी क्रांती टळेल.

–संपादक












## 'द्रष्ट्याचे विचार' कोणाचे ?

स. न. वि. वि.

या मे महिन्याचा संगीत विशेषांक पाहिला. प्रयत्नपूर्वक चांगला काढला आहे. त्या अंकात प्रारंभी "संगीतशास्त्र" या विषयावरील लो. टिळक यांचा १८९२ ऑगस्टमधील केसरीतील लेख उद्धृत केला आहे. संपादकीय खुलाशात त्या लेखातील विचाराना 'द्रष्टयाचे उद्गार' असे म्हटले आहे. ते अर्थात् बरोबर आहे. पण तो लेख प. वा. प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर (त्राटिकाकर्ते) यांचा आहे. मागल्या पिढीतील न. चि. केळकरांसारख्या लो. टिळकांच्या सहकाऱ्यांना ही गोष्ट माहीत होती. लेखातील शैली, "रंगेल लोकांनी संगीतासारख्या चित्राल्हादक विद्येला श्रेष्ठ स्थान द्यावे यात फारसे नवल नाही," "हल्ली पॅटी बर्नाट-सारख्या नर्तकीच्या पायाशी लाखो रुपयांचे ढीग पडतात, त्यातही काही आंतर-हेतु असला पाहिजे", पान ७ वरील मधल्या कॉलमातील पहिला परिच्छेद व त्यात येणारे शेक्सपीअरचे (छापण्यात मुद्रणदोष झालेले) अवतरण, पान ५३ वरील पहिला कॉलम, इत्यादीवरून तो लेख लो. टिळकांच्या शैलीशी, भाषेशी व सर्वसामान्य विचारसरणीशी फारसा जुळता नाही. प्रो. केळकर हे 'मराठा'चे संपादक होते व टिळक आगरकरांच्यात १८८७ पासून केसरीतील लेखनासंबंधी मतभेद होऊ लागल्यावर केळकरच केसरीत बऱ्याच वेळा लिहीत. केसरी ज्या आर्यभूषण छापखान्यात त्यावेळी छापीत असत, त्याची मालकी प्रो. वासुदेवराव केळकर यांजकडेच होती. केळकर १८९५ साली वारले. तोपर्यंत त्यांचा केसरी-मराठा पत्राशी लेखक म्हणून संबंध होता. ते-टिळकांचे सहकारी होते पण स्नेहीही होते. टिळकांनी फर्ग्युसन कॉलेज सोडल्या-वरही प्रो. केळकर, प्रो. भानु इत्यादि जुन्या सहकाऱ्यांचा टिळकांशी स्नेह राहिला होता. प्रो. केळकरांनी केसरीत इतरही अनेक लेख लिहिले आहेत. हे पत्र केवळ तात्पुरती माहिती पुरविण्या-साठी लिहीत आहे व म्हणून अधिक विस्तार करीत नाही. विशेषतः शेक्सपीयरच्या अवतरणाची पद्धत प्रो. केळकरांच्या स्वभावाशी मिळती जुळती आहे. टिळ-कांनी याविषयी लिहिले असते, तर त्यात भरताचे नाट्यशास्त्र, वैदिक ब्राम्हण-कथा आणि सामगायनाची यज्ञविषयक उपपत्ती यांचे मार्मिक उल्लेख फार सम-र्पक रीतीने आले असते. असो.

सहज लक्षात आले म्हणून लिहिले. टिळकांच्या चौथ्या लेखसंग्रहात त्यांचे संकीर्ण लेख घेताना न. चिं. केळकर यांनी हा लेख न घेण्याचे कारण असे की तो लो. टिळक यांचा नाही, ही गोष्ट त्याना माहीत होती, हे होय. कळावे.

**नाशिक. (प्रा.) वि. वा. आंबेकर**

## आपलेपणाची संवेदना

स. न. वि. वि.

आपल्या 'दीपावली' मासिकाचा मे १९६७ संगीत विशेषांक वाचला. अंकातील 'कधी काळी हे गीत बंद होता' हा श्री. अभिषेकी यांचा लेख खूपच आवडला.

यापेक्षा जीवनातील कृतार्थता दुसरी कोणती ? या प्रश्नावर लताताईचे उत्तर 'फार प्रेम करतात हे सगळे लोक माझ्या गाण्यावर' हे वाचल्यावर हृदयात एक प्रकारची आपलेपणाची संवेदना जागृत होते. एवढ्या मोठ्या कलावंताचे एवढे साधे रहाणे असेल, हे. वाचून नवल वाटते.

श्री. भोबे यांची संगीतमय प्रदीर्घ प्रीतिकथा इतकी चांगली आहे की तिचे शब्दांनी वर्णन करणे कठीणच.

अंकातील इतर लेख वाचकांवर प्रभाव पाडल्याशिवाय रहात नाहीत.

**कोटा-जंक्शन (राजस्थान) —वि. ज. राजकुंवर**

## सारस्वतांची विवाह समस्या

स. न. वि. वि.

या पत्राने सारस्वत समाजातील विवाह समस्येविषयी काही विचार मांडीत आहे. वाचकांना ते पटल्यास त्यानी आपली मते द्वारा संपादक दीपावली मासिक, मुंबई ४ या पत्त्यावर कळवावीत. साधारणपणे ३० सप्टेंबरपर्यंत येणारी सर्व पत्रे लक्षात




घेऊन पुढील योजना नक्की करता येईल.

सारस्वत समाज वस्तुतः ब्राह्मणांचाच एक पोटभाग असूनही काही सामाजिक गैर-समजुतींमुळे मराठीतील जी नियतकालिके या ना त्या स्वरुपात विवाहेच्छु स्थळांची माहिती प्रसिद्ध करतात, त्यात या समा-जातील स्थळाना योग्य प्रसिद्धि मिळत नाही. याबाबत काही संपादकांशी मी पत्रव्यवहारही केला होता व त्यानी ते मनमोकळेपणे मान्यही केले होते. तरीही त्यापुढचे पाऊल मात्र ते या ना त्या कारणाने कबूल करूनही टाकू शकले नाहीत ही वस्तुस्थिति आहे. दुसरे असे की हा एक असा समाज आहे की जो सबंध भारतात विखुरलेला आहे. इतकेच काय पण काही परराष्ट्रातही ही मंडळी स्थाईक झालेली आहेत. परंतु सर्वसामान्यपणे आर्थिक स्थैर्य मिळाल्या-शिवाय स्पष्टच सांगावयाचे तर सुखाने जीवन व्यतीत करता येण्यासारखी परि-स्थिती प्राप्त झाल्याशिवाय या समाजातील कर्ते पुरुष लग्नास सहसा तयार नसतात.

तेव्हा मी असे सुचवितो की दीपावलीने अशा स्थळांची माहिती एकत्रित करावी व ती प्रसिद्ध करावी. त्या माहितीची एक रुपरेषा ठरवून द्यावी. व ज्याना त्याची गरज असेल त्यानी दोन रुपयांची म. ऑ. दीपावलीस पाठवावी. आणि दीपावलीने त्या स्थळाचा फक्त पत्ता तेवढा कळवावा. तेथेच 'दीपावली'ची जबाबदारी संपुष्टात यावी. पुढील कोण-त्याही घटनेस कोणीही 'दीपावली'स जबाबदार धरू नये. कळावे.

**वसई. —बाबुराव कामत**

# चक्र दिवसाचे युगाचे

—मधुकर



**त्रस्त** करणारे उपटसुंभ विचार फसव्या हास्याखाली झाकून ठेऊन गंगाधर उठला आणि केसावर कंगवा न फिरवताच चपल्या सरकवून घराबाहेर पडला. अजूनहि एक रेंगाळणारे हसू त्याच्या जिवणीबाहेर पडण्याच्या प्रयत्नात होते पण त्याची तमा न करता त्याला वाटले की एक ब्लेड घेऊन तिने प्रत्येकाच्या चेहऱ्यावर एक एक लांब रुंद फुली मारीत जावे. लालभडक, धारदार आणि चिळकांडणारी!

घराबाहेर पडल्यावर पुनः त्याचे पिसाळलेले मन म्हणाले की उजवीकडे जाऊ नको, डावीकडे चल. आणि त्याने पायाचा रेटा देऊन मन उजवीकडे वळविले. पहिल्यांदाच त्याला तो सिनेमा लागला. दारावर एक जबरदस्त पोस्टर. टचटचीत नितंबाची अष्टावक्र अंगना आपल्या रडक्या मनाची धार धरून उभी होती. 'जगातले पहिल्या प्रतीचे चित्र' म्हणून वर एक ओळ लिहिली होती. तिकिटांसाठी वेडीवाकडी वहात गेलेली रांग एका 'मॅनहोल'जवळ संपली होती. तो रांगेच्या शेवटी क्षणभर उभा राहिला. प्रत्येकास त्याने मॅनहोलमध्ये सोडून तीनदा बुचकळून वर काढले. मग एकेकाच्या हाती एक एक तिकीट देऊन आणि प्रत्येकाच्या पृष्ठभागावर एकेक चापट मारून त्याने त्याना थेटरात नीट बसवून दिले. प्रत्येकाच्या हातात वेफर्स देण्यास तो विसरला नाही. शेवटच्या खुर्चीवर तो जाऊन बसला तेव्हा उजव्या बाजूच्या स्कर्टवालीचे नाक चिमटीत धरून त्याने हलविले आणि ती 'ईऽऽ' करून सफेद हसली तेव्हा त्याने तिच्या केसांचे एक चुंबन घेतले.

मग सिनेमा सुरू झाला. अवाढव्य जगास स्प्रिंग मारून ठेवली आहे. आणि ती ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे उलगडत आहे असे त्याला वाटले. इंडियन न्यूज रिव्ह्यू सुरू होताच 'झाडूवाला आला' म्हणून पुढच्या रांगेतील दोन चार कॉलेज पोरे ओरडली. त्याला वाटले बेजबाबदार म्हणून समजली जाणारी ही पोरंहि किती छान टीका करतात. आधीच्या अमेरिकन स्पोर्टस् समाचाराची न्यूज पहाताना हीच पोरं कशी देहभान विसरली होती. टोपलीत बसून नासके जीवन जगणाऱ्या या देशातील रटाळाना त्याने झाडूनी बदड बदड बदडले. छपन्न मजली इमारतींच्या मग्रूर देशात जाऊन फेडलेल्या कासोट्याचा तो काळा तत्वज्ञ जेव्हा 'धर्म, विश्वबंधुत्व, समाज, मानवता' असे पचापच

अनुक्रमणिका






**...ती भेटत राहिल्यावर मात्र स्वप्नांचा कशिदा विणला जात होता. एक भूक थैमान घालीत होती हे चक्क दिसत होते. पण तरीहि तिच्या भवती दैवी वलय सळसळत असावे, असा भास करून घ्यावयाचा प्रयत्न....**

थुंकत होता तेव्हा त्याने त्याचा रगडा करून म्हशीला आंवोण म्हणून पाजून टाकला...

मध्यंतराची घंटा खणखणत राहिली, तेव्हा त्याच्या मेंदूतील पेशीना विलक्षण मंथर गती प्राप्त झाली. त्या लयीस तो म्हणाला, 'आणखी...आणखी...'

पुनः डोक्यात विचार सुरू होण्यापूर्वी मेंदूच्या मृदंगात थैमान उठायला पाहिजे होते!

मध्यंतर होताच लोंढा थेटराबाहेर पडला. तो म्हणाला, "मी उठणार नाही, मी हलणार नाही." आणि लगेच आपल्या ठाम निश्चयावर त्याने अशी चणचणीत चपराक मारली की त्या आवेगात तो उठून बाहेर केव्हा आला तेच त्याला समजले नाही.

बाहेरचा प्रकाश डामराच्या पिंपात कालवून त्याने गटारात ओतला आणि आतला काळोख खिसे भरभरून बाहेर नेला. त्याला हायसे वाटले. त्या घट्ट, चकचकीत काळोखात त्याला सिगरेटचे लालबुंद टोक छान चमकले. त्या ठिणगीने सारा काळोख त्याने पेटवून दिला तेव्हा पेटवलेल्या लंकेतून सैरावैरा धावणाऱ्या राक्षसांप्रमाणे सारे थेटर तकाट धावू लागले. थेटराच्या शिखरावर जळती सिगारेट हातात धरून तो खदखदत उभा राहिला तेव्हा त्याच्या डोळ्यातून ज्वाळा बाहेर पडल्या.

...मग त्याने हा खेळ आवरता घेतला. पुनः थेटर भरले. मुख्य चित्र सुरू झाले.

...सार्वजनिक फोनवरून पोलिसाना निरोप देऊन बरोबर सात वाजता रोज एक खून करून एक इसम त्या अवाढव्य शहरात धमाल उडवून देत होता. त्याला हा कार्यक्रम पटला. त्या माणसाच्या चेहऱ्याचे स्नायू त्याने चिमटीत पकडले, आणि आपल्या चोर-खिशात ठेऊन दिले. पुनः ते हवे तेव्हा वणवण हिंडायला नको. एक अणकुचीदार टोच्या घेऊन खून करावा हे मात्र त्याला पटले नाही. खून करण्यासाठी किंवा मरण्यासाठी त्याला पिस्तूल व बंदूक हीच आयुधे पसंत पडत. तलवारीने स्वतःचे शिर उडविण्यास त्याने त्रिकालीहि संमति दिली नसती किंवा त्याने कोणाचे शिर उडविले नसते. सुरीची भोसकाभोसकी त्याला एकदमच असंस्कृत व पोरकट वाटे...'जन गण मना'च्या तालासुरावर धिमी पावले टाकीत तो चालत होता, उभ्या आडव्या दोन चकरा मारल्यावर तो उंच केलेल्या व्यासपीठावर जाऊन उभा राहिला. समोर माणसांचा सागर पसरला होता. केवळ हुतात्म्यानाच अवगत असलेले ते धीरोदात्त हास्य चेहऱ्यावर किंचितसे दाखवून तो समोरच्या जनसागराकडे पाहून स्वगतला "आज प्रेक्षकांची तर बरीच गर्दी दिसते." आणि मग लगेच धाड् धाड् दोन गोळ्या त्याच्या छातीतून आरपार गेल्या! 'इन्किलाव झिंदाबाद'च्या घोषणा थांबल्या तेव्हा अगदी शांत-प्रशांत वातावरणात दोन हात लांब पसरलेल्या, डोके किंचित् खाली झुकलेल्या व पायाची खाली आढी झालेल्या त्याच्या शरीरातून रक्त ठिबकत होते व मागच्या चौकटीवर त्याचे शिर वा शरीर आपटत राहिल्याचा आवाज येत होता,

'टक्, टक्, टक्!....'

—सारे सहन करून, करीत, करीत तो असा हुतात्मा होणार होता! (त्याने उजवा हात ठेवलेल्या खुर्चीच्या हातावर शेजारच्या धटिंगणाने जबरदस्तीने आपला हात सरकवला व त्याचा हात तेथून हुसकून दिला. त्याला त्या अपमानाचा झटका बसला. त्याचा गळा दाबावा असा एक विचार त्याच्या मनात डोकावला. अचानक Sorry म्हणून तो पुटपुटला आणि दोन्ही हात क्रॉस करून त्याने छातीशी धरले. समोरच्या पडद्याकडे तो एकाग्रपणे पहात होता ना! चित्राशी एकरूप झाला होता! इकडे तिकडे त्याचे लक्ष होतेच कुठे? उगाच काहीतरी!)

अडीच तास दहापांच निरपराध माणसे खर्ची घालून त्या सिनेमातल्या चोराने मोठी गोड धमाल उडवून दिली. शेवटी तो सांपडला. मानसशास्त्राच्या एका अत्याधुनिक विचारसरणीप्रमाणे त्याच्या गंडाची उकल झाली. विकृतीच्या शास्त्राचे सोदाहरण विवेचन अभ्यासून थेटर बाहेर पडले——

त्या विकृत, अभिनव, कृतीप्रधान व बेबंद वातावरणातून तो जेव्हा बाहेर पडला तेव्हा त्याला एकदम धक्काच बसला. ते सारे विकृत वातावरण प्रामाणिकपणाच्या चौथऱ्यावर कसे पक्के उभे होते. बाहेर पडल्यावर त्याला आपल्या भोवताली अनेक माणसांची प्रेते आणि मुखवटे दिसले. आजकाल एकजात लबाड, स्वार्थी, असंस्कृत व अडाणीपणाचा जो गणवेष झाला आहे त्या सफेत धोतरात, टोपीत, नेहरूशर्ट–जाकिटात दोन जनसेवक शेजारून चालले होते. त्यांना विधानसभा मुंबईत असते की पौडात हे माहीत नव्हते. पण पगार भत्याचा मलिदा मात्र त्यांच्या शरीरावर चांगलाच उतला होता. चार वर्षे नियमित सिनेमा पाहाण्याचा कोर्स घेतलेले अनेक कॉलेजयुवक नव्या अमेरिकन पँटच्या फॅशनमध्ये झुरळासारखे वळवळत चालले होते. वखवखलेली कामेच्छा बुरखा म्हणून पांघरून तमाम नवजवान साऱ्या तरुणींचे चिरूट करून फुंकत होते. भयानक चुलवणावर आटवून फेसाळलेले जीवन एका बुदल्यातून बाहेर सांडून रस्त्यावर ओघळले होते....

गंगाधरला वाटले की हातभट्टीच्या धंद्याइतका नितान्त प्रामाणिक असा दुसरा धंदा आज कुठे चाललेला नाही! सुपारी घेऊन खून करणाऱ्या मवाल्याइतके

खेळाचे नियम नीटपणे कोणीच पाळत नाही !

एक मोठा चौक ओलांडून तो फूटपाथवर आला.

——त्या अजस्र चौकाच्या मध्यभागी एक भव्य पुतळा उभा होता. माणसांचे कल्याण व्हावे म्हणून त्याने मोठी तपश्चर्या केली होती. म्युनिसिपालिटीच्या दिव्याखाली बसून अभ्यास केला होता. ( म्युनिसिपालिटीच्या खऱ्या दिव्याखाली मात्र अजूनहि अंधारच होता! ) पुढे तो फार मोठा असामी झाला तेव्हा रस्त्याने जाताना त्याने चक्क एका भंगिणीच्या डोक्यावर तिला न पेलणारा, तो बोजा उचलून दिला होता. ( कोणी म्हणतात की त्या डब्यात त्याचीहि विष्ठा होती. पण हे खरे नव्हे. हे उगीच यमक जुळविण्यासाठी म्हणायचे. ) फार मोठा झाला तो नंतर. अनेक वर्षे त्याने चाकरी केली. अशा माणसांच्या मागे लक्ष्मी बटीक होऊन धावते त्याला ते तरी काय करणार? मग पुढे त्यानी संत वाङ्मयावर लिहिले. बुद्धि मुळी चतुरस्त्रच. अशी ती एक थोर जीवनकथा. आता त्या पुतळ्यावर एक कावळा बसला होता. ( चालू नगरपित्यांच्या एका कंपूत तो पुतळा तेथून हलवण्याचा विचार चालू होता. कारण चालू पंतसचिवांचाच पुतळा तेथे उभा करून आपल्या सद्भावना ताबडतोब 'सफलित' करता येतील अशी त्यांना खात्री होती. त्यानी मोठा महत्वाकांक्षी कार्यक्रम हाती घेतला होता. सारे जनसेवेच्या आंतरिक उमाळ्यातून उमटलेले वमन. पंतसचिवांना गल्लोगल्ली मतांच्या अड्ड्यावर ठेकेदारी करणारे ठेकेदार हवेच होते. ठेकेदारांनी पंतसचिवांच्या मागे फळी बांधून उभे रहायचे आणि मग पंतसचिवांनी आपल्या अवाढव्य यंत्रणेच्या संरक्षणाखाली ठेकेदारांना गल्लोगल्ली व रस्तोरस्ती सरदेशमुखी तोडून द्यायची, अशी ही चिरेबंद यंत्रणा होती. त्या चिरेबंदीतील 'चावी' (kev-stone) म्हणजे अशा ऐन मोक्याच्या जागा आणि तेथले हे उभे पुतळे. काळाबरोबर आदर्श बदलतात. मधुकऱ्याचा विद्वान आणि विद्वानाचा लोकसेवक ही प्रथा आता जुनी झाली. आता मधुकऱ्याचा, त्याच आश्रमात, जनसेवक होऊ शकतो.

त्या भव्य पुतळ्याभोवती ऐसपैस आयलंड. आयलंडच्या भोवती रहदारीचे कडे. ओघळतीय ती रहदारी एकसारखी. मोठमोठ्या ऐसपैस मोटरगाड्या सारख्या धावणाऱ्या. सचिवालयातून मंत्र्याच्या घरी, घरातून दूर उपनगरातील रम्य निवासस्थानाकडे. एकसारखे धावायचे. तंत्रे जुळवायची. खात्री पटवायची. काम सांधायचे, दाम चुकते करायचे. असा असतो हा सारा समाजव्यापार. मोठा गुंतागुंतीचा, चमत्कारिक. 'येरा गबाळ्याना न जमणारा.' पण जमल्यानंतरहि 'येराना' थोडे 'गबाळेपण' टिकवावे लागते. जनसेवक असतात ना ते. दलितसेवक. ते आहेत तोवर दलितसेवक असायचेच. दलित संपले तर त्यानी सेवा कोणाची करायची? कशी करायची? तेव्हा दलित हवेतच. किंबहुना ते आहेत म्हणूनच दलित आहेत. दलित आणि ते अभंगच. एकाच नाण्याच्या दोन बाजू. एकाच सफेत टोपीची दोन टोके.

फूटपाथच्या एका कोपऱ्यावर गंगाधर उभा राहिला, पुतळ्याने दोरी धरून चालवलेला बाहुल्यांचा खेळ पहात. समोरासमोरचे दिवे उघडत, मिटत. हिरवे दिवे झाले की पुढे सरकायचे. तांबडे झाले की थांबायचे. दिवे आपोआप बदलतात. चाके आपोआप धावतात. फक्त बँका चालतात, चालाव्या लागतात. बँकबुके भक्कम असली की सारी रहदारी आपोआप नियंत्रित होते. सगळा 'सायलेन्स झोन'. सगळे समजून घ्यायचे. तेरी बी चूप, मेरी बी चूप. कधी कधी 'शांती'चा बुरखा फाडून बोंबाबोंब करावी लागते. तीहि व्यवस्थित केली तर फायद्याची होती. काही गळ्यात आलेच तर, अगदी शेवटी 'मी तसे म्हणालोच नाही' म्हणायचे. फार तर 'आमचा गैरसमज झाला' म्हणून बुशकोट झटकायचा. लोकानी अंतच पाहिला तर 'आम्ही गाढव होतो' म्हणून मोकळे व्हायचे. लोक हंसतात. खुष होतात. कारण गाढव असणारे 'आम्ही' असतात, 'मी' नव्हे. हीच या खेळातील गंमत. मोठी मजा.

मजा? गंगाधर अडखळला. समोरच्याच बसस्टॉपसमोर एक लहान पोर डोंबाऱ्याचा खेळ करीत होते. लोकांचे लक्ष

(पृष्ठ ५३ वर पहा)

**वैचारिक क्रांति !**



लवकरच आम्ही पुन्हा सत्तेवर येऊ--कारण 'ते'ही आमच्यासारखेच बोलताहेत व वागताहेत...... "

# मराठी माणूस मार कां खातो ?



**मराठी माणूस इतकी वर्षे काय अगदी आनंदी, सुखी जीवन जगत होता ? काय त्याचे घरी हत्ती घोडे झुलत होते ? मराठी माणसाच्या अवस्थेचा ऐतिहासिक व सामाजिक मागोवा श्री. पु. रा. बेहेरे यांनी घेतला. त्याचेच हे चित्रण.**

**'मराठी** माणूस मार कां खातो?' अशी चर्चा मध्यंतरी अतिशय जोरदारपणे चालू झाली. आतापर्यंत तो लाडू पेढे खात होता आणि आत्ताच एकदम तो मार खाऊ लागला असे काही म्हणता येण्यासारखे नाही. मग ही चर्चा यावेळीच अशी उग्र स्वरुपाची कां होऊ लागली ? थोडे मागे वळून पाहिले तर 'महाराष्ट्र मागे कां ?' या विषयाची चर्चा मराठी वृत्तपत्रात मधून मधून उफाळून येते असे आपल्याला दिसून येईल. काही तरी निमित्त होते आणि चर्चा सुरू होते. आणि त्याच वेळी एकादी चळवळही निर्माण होते. महाराष्ट्रीय बाण्याचा, परंपरेचा मराठी लोकांना जबरदस्त अभिमान आहे आणि त्यामुळे इतरांच्या तुलनेने आपण मागे आहोत अशी जाणीव मराठी माणसाला टोचत असते. ही जाणीव मुख्यतः मुंबईतील मिसळ समाजातले आपले स्थान त्याच्या लक्षात आले म्हणजे अधिक तीव्रतेने होते. आणि त्या जाणीवेतूनच या चर्चा आणि चळवळीही होत असतात. एका परीने या चळवळीचे मूळ मुंबईत आहे. कारण मुंबईवर मराठी लोकांचे नियंत्रण तर नाहीच; पण मुंबईच्या व्यवहारात त्याना मानाचे स्थानही नाही.

महाराष्ट्रातील गेल्या पंचवीस वर्षांतील चळवळींचे हे एकप्रकारे ध्रुपदच होऊन बसले आहे की, महाराष्ट्रात मराठी माणसाला स्थान नाही. ही चळवळ आपण संयुक्त महाराष्ट्र निर्मितीच्या मागणीशी जोडू शकू; विरोधी पक्षाच्या चळवळीशीही जोडू शकू. बहुजनसमाजवादी शे. का. पक्षाने कॉंग्रेसच्या राज्याला शेटजी-भटजीचे राज्य म्हणून जेव्हा शाप दिला तेव्हा शंकरराव मोरे यांनी जरी मार्क्सवादी पोषाख या भावनेला दिला आणि ब्राह्मणेतर चळवळीचा वारसा असल्यामुळे जरी ती ब्राह्मणविरोधी भासली तरी तिचे मूळ मराठी माणसाला स्थान नाही या वस्तुस्थितीतच होते. विरोधी पक्षाची ही चळवळ पुढे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत बेमालूमपणे मिळून गेली याचे हेच कारण होते. महाराष्ट्राला कुठे स्थान नाही या भावनेला संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत संपूर्णपणे आणि प्रखरपणे राजकीय स्वरुप आले.

या चळवळीच्या वेळी महाराष्ट्राला एक जुनाच साक्षात्कार नव्याने झाला. तो असा की, महाराष्ट्राला प्रभावी नेतृत्व नाही; दिल्लीत महाराष्ट्राला कोणी विचारीत नाही. लोकमान्य टिळकांनंतर महाराष्ट्राला अखिल भारतीय प्रतिष्ठेचे असे नेतृत्व कॉंग्रेसमध्ये मिळालेलेच नव्हते. पण याची खंत स्वतःला टिळकपंथी म्हणविणारे किंवा कॉंग्रेसचे विरोधक एवढेच करीत होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळात ही खंत सार्वत्रिक झाली. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत ती कळसाला पोचली. आणि संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीबरोबर यशवंतरावांच्या नेतृत्वाचा उदय झाला आणि महाराष्ट्राला अखिल भारतीय प्रतिष्ठेचे नेतृत्व मिळाले असे मराठी लोकाना वाटू लागले. महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली म्हणजे मराठी लोकांचा सर्व बाजूनी एकदम उत्कर्ष होईल अशी भावना निर्माण झालेली होती. पण ती आशा विफल ठरली. यातून जो असंतोष आणि वैफल्य निर्माण झाले

अनुक्रमणिका

होते त्याला निवडणुकीच्या मोसमात 'शिवसेने'च्या उद्रेकाने व्यक्त स्वरुप आले.

### मराठी माणसाला आलेला प्रत्यय

शिवसेनेला जागतिक प्रसिद्धी विकृत स्वरुपात मिळून त्यावरोबर महाराष्ट्राचीही वदनामी झालेली आहे. शिवसेनेला सी. आय्. ए. चा (म्हणजे अमेरिकन हेर संघटनेचा) पैसा मिळतो असा प्रचार रशियाने चालविला आहे. याचे कारण रशियाचे प्रेमपात्र अशा कृष्ण मेननचा मुंबईत जो दोनदा पराभव झाला तो काँग्रेसने शिवसेनेची मदत घेऊन केला हे होय. काँग्रेसने शिवसेनेची ही मदत कां घेतली ? कृष्ण मेनन यानी दक्षिण भारतीयांची मते ही आपली खास मिरास असल्याचा आविर्भाव केला. दक्षिण भारतीयांमध्ये अशा तऱ्हेचा प्रांतीय प्रचार अतिशय उग्र स्वरुपात झाल्यामुळे त्याची प्रतिक्रिया साहजिकच महाराष्ट्रीय माणसावर झाली आणि शिवसेनेचा सूर त्याच्याशी सुसंगत असाच होता. मुंबई हे महाराष्ट्राचे केंद्र आहे आणि मुंबई महाराष्ट्रात यावी यासाठी आपण एक अभूतपूर्व लढा केला ही जाणीव असल्यामुळे मुंबईवरच्या आपल्या हक्कावद्दल मराठी माणसाच्या भावना विशेष स्वरूपाच्या आहेत. पण मुंबईत मराठी लोकसंख्येचे प्रमाण दिवसेंदिवस कमी होत आहे; मुंबईच्या व्यापार उद्योगात मराठी माणसाला स्थान नाही; वरिष्ठ आणि कनिष्ठ नोकऱ्यातही मराठी माणसाना स्थान नाही; सरकारी गृहनिर्माण मंडळाच्या जागात इतरांचीच सोय होते; मुंबईतील जागा वळकावून तेथे बेकायदा चाळी उठविण्याचा उद्योग बिगरमराठी लोकच करतात; इतकेच नव्हे तर झोपडपट्ट्या त्यानीच व्यापल्या असून हातभट्टीच्या दारूचा धंदा हे बिगरमराठी लोकच प्रामुख्याने चालवीत आहेत; आणि त्यामुळे सर्वत्र या बिगरमराठी लोकांची गुंडगिरी मराठी लोकांना सहन करावी लागत आहे. कृष्ण मेननच्या निवडणुकीच्या निमित्ताने या सर्व गोष्टींची उजळणी झाली आणि मराठी लोकांना जिव्हारी लागण्यासारखा या गोष्टींचा प्रत्ययही आला. कृष्ण मेननच्या पराभवाने चिडलेल्या दाक्षिणात्य पुढाऱ्यांनी शिवसेनेच्या निमित्ताने महाराष्ट्राची सर्वत्र वदनामी केली. यामुळे मराठी माणसावर अन्याय होतो ही भावना अधिकच तीव्र झाली. मराठी माणूस मार खात आहे असे वातावरण यामुळेच मराठी माणसात निर्माण झाले.

प्रश्न असा आहे की, मराठी माणूस मार खात आहे हा समज खरा की खोटा ? खरा असेल तर कितपत खरा आहे ? त्याची कारणे काय ? मराठी माणसाची पीछेहाट झाली आहे ही गोष्ट बऱ्याच अंशी खरी आहे. ही पीछेहाट मुख्यतः मुंबईसारख्या शहरात प्रामुख्याने दिसते. जे मुंबईत घडत आहे ते उद्या महाराष्ट्रात इतरत्र मोठ्या प्रमाणात औद्योगिकरण झाले तर तेथेही दिसेल. ही आपत्ती टाळायची असेल तर मराठी लोकांनी जागृत होऊन स्वतःच्या उत्कर्षाचा विचार करण्याची आवश्यकता आहे. मराठी लोकांनी आपल्या समाजावद्दल प्रेम आणि अभिमान वाळगणे याचा अर्थ इतरांचा द्वेष करणे, त्यांच्याशी तुसडेपणाने वागणे असा होत नाही. पण मराठी लोकांचा अभिमान बहुतेक इतिहासात होऊन गेलेल्या गोष्टींभोवती गुरफटलेला आहे. आजच्या वस्तुस्थितीशी त्या अभिमानाचा संबंध असला पाहिजे ही जाणीव एकंदरीत कमीच आहे. त्यामुळे अभिमानाला वढाईचे स्वरुप येते याची खंत मराठी माणसांना वाटत नाही. मराठी लोकांचा स्वाभिमान हा बहुतेक बोलघेवडा आहे; आणि त्याचे आपल्या लोकांवरचे प्रेमही तकलुपी असेच आहे. त्यामुळे मराठी लोक आपल्या लोकांसाठी झीज सोसतील, त्याना पुढे आणण्यासाठी मदत करतील असे दृश्य तुरळकच दिसते. आणि यामुळेच या बोलघेवड्या अभिमानाला इतरांच्या दुस्वासाचे स्वरुप आहे असे इतरांना वाटते.

### काही ऐतिहासिक कारणे

मुंबईमध्ये मराठी लोकांना मानाचे स्थान नाही याला ऐतिहासिक कारणे आहेत. एक तर मुंबई शहरातल्या व्यापार उद्योगाची उभारणी बव्हंशी बिगरमराठी लोकांनी केलेली आहे. आणि वरिष्ठ नोकरवर्गातही मद्रासी बंगाली लोकांतल्या उच्च शिक्षित बुद्धिमान लोकांचीच वर्णी लागते. आणि एकदा जे समाज पुढे गेले ते पुढे पुढेच जात रहातात. ज्या ठिकाणी औद्योगिकरण मोठ्या प्रमाणावर होते आणि ते मुख्यतः बाहेरच्या लोकांनी केलेले असते तेथे स्थानिक लोकांना हक्काने वरिष्ठ जागा मिळणे कठीणच असते. शिवाय खालच्या स्तरावरही वाहेरच्या लोकांचीच भरती अपरिहार्यपणे होते. याबावतीत परिस्थिती थोडी नामुष्कीचीच आहे. कारण नवे नवे उद्योग काढणे आणि या पूर्वीच्या धंदेवाल्यात मिळणे ही गोष्ट ताबडतोब होण्यासारखी नाही. ऐतिहासिक कारणांनी जे दोष आणि मागासलेपणा येतो तो एक प्रकारच्या आनुवंशिक रोगासारखा असतो. **यात दुर्दैवाची गोष्ट आहे ती अशी की, मराठी लोकांनी उद्योगधंद्यात पुढे येण्यासाठी काही योजनाबद्ध असे प्रयत्न होत**

[पृष्ठ ५८ वर पहा]

**दारुबंदीतली क्रांति !**



**पूर्वी ट्यूबमधून नेत असत......आता 'पॉश' गाडीतून नेतात!!**








अनुक्रमणिका

# तेजाची बाळे * * *



—प्रभाकर शेणई

( किल्ले रायगड
प्रहर दुसरा. उत्तरार्ध.

महाराणी येसूबाई यांचा महाल. तत्कालीन पद्धतीची सजावट. मोंगलीयन व हिंदु पद्धतीची. कमाननीय गवाक्षातून दूरवर असलेल्या बाजारपेठेचा काही भाग व जगदीश्वराच्या मंदिराचा केवळ कळस दृष्टीक्षेपात येतो आहे. कळसावर भगवे फडकते आहे.

सन १२ एप्रिल १६८९. ऐन धामधुमीचा काळ. संभाजी राजे कैद झाले. आणि इतिकादखानाने गडाला वेढा दिला. खानाच्या छावणीतून गडावर तोफांचा व गरनाळांचा मारा अधुनमधून होतो आहे. त्याचा अस्पष्ट प्रतिध्वनि महालात उठतो आहे. वातावरण थरारते आहे. गड शांत पण अस्वस्थ.

चिंताग्रस्त असलेली महाराणी येसूबाई सरनौबत संताजीरावांशी बोलत प्रवेशते. पंचवीसच्या आसपास असलेली ही स्त्री तोलून मापून बोलणारी. संताजीचे अदबशीर वागणे. ]

**येसूबाई**:–तेव्हा सरनौबत, तुम्हाला हवे ते हिसाब मिळाले. देवा ब्राह्मणाच्या राज्याचे आधारस्तंभ आता तुम्हीच आहात. आमचा तुमच्यावर अधिक भरोसा आहे, विश्वास आहे.

**संताजी**:–बाईसाहेबानी आमच्यावर सुपूर्त केलेली जबाबदारी आम्ही जाणून आहोत. बाईसाहेबांची आमच्यावर कृपा असावी.

**येसूबाई**:–आम्हाला आता स्पष्टच दिसतं आहे. रायगड आज ना उद्या मोंगलांच्या ताब्यात जाईल. नि आम्ही...आणि ही मराठी दौलत........

**संताजी**:–छे, छे! बाईसाहेब असं बरीक अमंगळ—

**येसूबाई**:–सरनौबत! ही दौलत उभारताना कोण सायास पडले मामंजीना! तोलामोलाचे प्राण खर्ची झालेत; मोंगलांचा काहीच अधिकार नसताना, हे श्रीचं वैभव सुखासुखी त्यांच्या हवाली होत आहे म्हणून आतडं कसं ताडताड तुटतंय. जीव नुसता थरकून उठतोय. काही सुचेनासं झालय् आम्हाला!

**संताजी**:–बाईसाहेबांनी गनीमांची एवढी सलाबत घेण्याचं काहीच कारण नाही. आपली आज्ञा असेल तर आम्ही अद्यापि देखील वेढा लढवायला तयार आहोत.

**येसूबाई**:–ओंजळभर शिबंदीच्या जोरावर वेढा किती दिवस लढविणारहात, सरनौबत! हकनाक प्राणांची उधळण करण्यापेक्षा गड खानाच्या हवाली करणं अधिक रास्त आहे.

**संताजी**:–बाईसाहेबांचा युक्तिवाद आम्ही जाणून आहोत. पण आपण असा विचार करावा की—

**येसूबाई**:–रायगड पडला की स्वराज्याचा कारभार आटोपला. हेच बतावणार आहात ना? आम्ही देखील या गोष्टीचा पूर्व-

*"या आनंदभुवनात श्रींचं राज्य वैभवाला आलं पाहिजे. तुमच्या पराक्रमाला सीमारेषा नाही. पण सरनौबत, तुमच्या, पराक्रमाची, तुमच्या वीरत्वाची खरी कसोटी पुढंच आहे. आज आहे तो तुफानाचा इशारा. आगीचे लोळ उधळीत येणारे वादळ अद्यापि यावयाचं आहे....."*

विचार केला आहे. रायगड गेला म्हणजे हिंदवी तख्ताची शान-शौकत बरबाद झाली. रायगड म्हणजे स्वराज्याचं नाक. तेच बंद झालं की हा स्वराज्याचा देह शांत व्हायला कितीसा अवघी लागणार आहे. क्षणभर आम्ही देखील या विचाराने दडपून गेलो होतो. थरकून गेलो होतो. पण रायगड त्यांच्या हवाली केल्या-शिवाय गत्यंतर नाही, सरनौबत!

**संताजीः**–मग आमच्या तलवारीच्या धारेची ती काय फर्जद राहिली, बाईसाहेब! आमच्या पराक्रमाच्या खातर आपण आम्हाला सरसेनापती केलत. आमचा गौरव केलात. आम्ही धन्य झालो. कृतार्थ झालो. आमच्या पराक्रमाचं आमच्या आजवरच्या तपश्च-र्येचं चीज झालेसं वाटलं. पण बाईसाहेब, तुम्हीच असं धोरण स्वीकारलत तर––

**येसूबाईः**–संताजीराव, तुमच्या गरम रक्तातला उसळता आवेश आम्ही जाणतो. पण काळ फिरला आहे. उलटे वारे वाहा-ताहेत. त्याना छातीवर झेलू घेऊ गेलो तर छाती फाटून जाईल अशानं. त्याना पाठीवरच झेललं पाहिजे. फार सावधीनं, जागृकतेनं.

**संताजीः**–पण बाईसाहेब––

**येसूबाईः**–आज आहे ती वादळापूर्वीची शांतता! वीज कोस-ळण्यापूर्वीचा कडकडाट! शाबिती कमी आणि धोका अधिक तेव्हा असं एकतर्फी धोरण तारक होण्यापेक्षा मारकच अधिक आहे. दौलतीच्या धोक्याचं आहे.

**संताजीः**–पण रायगडासारखा बुलंद गड असा तडकाफडकी गनीमांच्या हवाली करणं––

**येसूबाईः**–मराठ्यांच्या तलवारी बोथट झाल्या नाहीत अंजून. गड आज पडला तर उद्या घेता येईल. पण त्यासाठी आज हकनाक प्राणांची उधळण कशासाठी! आज प्रत्येकजण पृथ्वी-मोलाचा आहे. वादळलेली हवा पुन्हा स्थिरावली की उठाव करायला सोपं जातं. दमादमानं गड पुन्हा सर करता येतील. आज तुम्ही बादशहावर तुटून पडाल. धनाजीरावांची घोडदौड सुरू होईल. पण एका झाडाच्या हालण्याने काही झंझावात उठत नसतो. फंदफितुरी आधी ठेचली पाहिजे. बादशहाच्या कृपासावलीत जिंदगी खुरटी करून बसलेले वतनदार पुन्हा फोडले पाहिजेत. स्वराज्यात सामील करून घेतले पाहिजेत. मग बंदोबस्ती आणि गड घेणे!

**संताजीः**–पण आज आपण धोक्यात असताना तुमच्या रक्षणासाठी आम्ही––

**येसूबाईः**–आम्ही आमच्या संरक्षणाचा आधीच विचार करून ठेवला आहे, सरनौबत!

**संताजीः**–(चपापून) मतलब?

**येसूबाईः**–आम्ही खानाच्या हवाली होण्याचं ठरविलं आहे!

**संताजीः**–(विस्फारून) बाईसाहेब!

**येसूबाईः**–हा आमचा दुर्विचार होत नाही, सरसेनापती! आम्ही हे धोरण स्वीकारलं ते विचारानंच, स्वखुषीनं! आत्मतोषानं!

**संताजीः**–छे, छे! बाईसाहेब! मराठ्यांची राजस्वामीनी आम्ही अशी सुखासुखी मोंगलांच्या ताब्यात जाऊ देणार नाही. मग या संताजीचा काय उपयोग! या तलवारीचा काय उपयोग! आमच्या जिंदगीचा, आमच्या पराक्रमाचा काय उपयोग! नाही, असं होऊ देणार नाही. हे होणं नाही, होणार नाही.

**येसूबाई** : आमच्या मनाचा निश्चय झाला आहे, सर-नौबत! स्वखुषीनं सती निघालेल्या साध्वीला तुम्ही देवाब्राह्मणाच्या पवित्र महाद्वारातून मागे खेचणारहात? तिला भ्रष्ट करणार-हात? तिला तडफडत ठेवणारहात तुम्ही?

**संताजी** : बाईसाहेब––

**येसूबाई** : संताजीराव, तुमच्या मनचं दुःख आम्ही समजतो. पण गत्यंतर नाही, इलाज नाही.

**संताजी** : आधी आमचा मुडदा पडेल इथं आणि––

**येसूबाई** : सरनौबत!

**संताजी** : क्षमा करा, बाईसाहेब! पण हा संताजी हयात असे तो हे होऊ देणार नाही. हे होणं शक्य नाही.

**येसूबाई** : आमच्यावरची आपली स्वामीनिष्ठा आम्ही जाणून आहोत, सरनौबत! पण असं होण्यातच दौलतीला सुरक्षिता आहे. मराठी कळीकाळाच्या मगरमिठीतून सुखरूप राहाणार आहे, याचा विचार करावा–

**संताजी** : आम्ही समर्थ आहोत वादळाला टक्कर द्यायला! पण आम्ही मराठी दौलतीचं कुंकू गनीमांच्या हवाली करणार नाही. प्रत्येक मराठा लढेल, मारेल वा मरेल. पण जिवंतपणी ही श्रींची शान धुळीनं माखवणार नाही आम्ही.

**येसूबाई** : चुकताहात, सरनौबत!

**संताजीराव** : तुमच्या या धोरणानं आम्ही पुरते गोंधळून गेलो आहोत, बाईसाहेब! आजवर आम्ही तलवार मारली, गनीम जेर केला तो मरू किंवा मारू या उमेदीन. या एकाच जिग-रीनं! आमच्यापुढे अनेक पेचप्रसंग होते. पावलोपावली सुरुंग पेरले गेले होते आमच्या मार्गावर. पण मृत्यु आम्ही घोडदौडीच्या टापांखाली चेंदाळवत शत्रूला तलवारीच्या धारेचं पाणी पाजत होतो. पडत होतो. सावरत होतो. रक्तानं माखत होतो. पण परतीचा शब्द आमच्या ओठावर झुकला नाही. पावलांनी








माघार घेतली नाही. माघारीची याद आम्हाला झालीच नाही म्हणून आम्हाला—

**येसूबाई :** आमचं धोरण पटत नाही, हेच ना म्हणायचंय तुम्हाला? पण सरनौबत, तुम्ही वागलात-बोललात ते मर्दाला साजेसं! मर्दासारखं! कळीकाळीच्या गाठी तुम्ही सहज सोडवाल. पण आमच्यापुढं आवर्तासारखी गरगरत असलेली रेशमी गांठ नाही सोडवता यायची तुम्हाला!

**संताजी :** ( चमकून ) आम्ही नाही समजलो याचा अर्थ !

**येसूबाई :** आमच्यापुढं प्रश्न उभा आहे तो मरणाचा किंवा रक्षणाचा! पारडं दोलायमान आहे. दोन्ही तोलामोलाची पारडी. पण आम्ही विचार केला. आणि मुस्तेज झालो खानाचे कैदी व्हायला !

**संताजी :** म्हणजे!

**येसूबाई :** भावोजींना चंदीचंदावर प्रांती पाठविण्याचा आमचा विचार आहे. नव्हे, आमचा निर्धार आहे. स्वराज्याचं खरं कुंकू तेच आहे. सरनौबत! आधी त्यांचं रक्षण, मागाहून आम्ही!

**संताजी :** राजाराम महाराजांचं संरक्षण करणं हे आम्ही आमचं कर्तव्य समजतो, बाईसाहेब! पण त्यापायी—

**येसूबाई :** चुकताहात, संताजीराव! राजकारणात अशी सरळ पावले टाकणं कदापिही धोक्याचंच असतं. एका धारेखाली सारे सापडतात अशानं. राजकारणात भावना माराव्या लागतात. मन दगडासारखं घट्ट करावं लागतं. सगेसोयरे विसरावे लागतात. माणुसकीवरचा तावा सोडावा लागतो. आणि अमंगळ रास्ते तुडवावे लागतात.

**संताजी :** बाईसाहेब—

**येसूबाई :** आणि समजा सरनौबत! भावोजींच्या समवेत आम्ही चंदीचंदावर प्रांती निघून गेलो तर बादशहाच्या साऱ्या फौजा आमच्या पाठोपाठ येतील. प्रांत अपरिचित. परकीय. अशात दगाफटका होऊन आम्ही सारेच बादशहाच्या हाती सापडलो तर बादशहाच्या छावणीत दिवाळी दसरा दोन्ही एकाचवेळी सोहळे साजरे होतील. बादशहाचं राज्य होईल. आजवर पृथ्वीमोलांच्या प्राणांची दौलत रिकामी केली तिचं चीज मातीमोल ठरेल. मामंजींचं स्वप्न धुळीला मिळेल. आणि मराठी साम्राज्याचा इतिहास एवढ्यापुरताच राहील. इथंच संपेल. पुढं नेस्तनाबूत होईल. आमचा जीव गुदमरतो आहे तो एवढ्याचकरिता, सरनौबत! ही मराठी शानशौकत बरबाद करायची नाही आम्हाला! ती तारली पाहिजे. या आनंदभुवनात श्रीचं राज्य वैभवाला आलं पाहिजे. तुमच्या पराक्रमाला सीमारेषा नाही. पण सरनौबत! तुमच्या पराक्रमाची, तुमच्या अंगच्या वीरत्वाची खरी कसोटी पुढंच आहे. आज आहे तो पुढच्या तुफानाचा इशारा. आगीचे लोळ उधळीत येणारं वादळ अद्यापि यायचं आहे. तेव्हा—

**संताजी :** आम्ही आमच्या शिरावर घेतलेली जबाबदारी आम्ही ओळखून आहोत, बाईसाहेब!

**येसूबाई :** आज साऱ्या स्वराज्यभर मोंगल पसरले आहेत. मराठा कापला जातो आहे. ( कळ आवरत ) चढती होते आहे ती मोंगलांची! संताजीराव, आज उभे स्वराज्य जळते आहे हो. कसा भडका उडाला आहे आमच्या दिलाचा.

**संताजी :** यावावतीत बाईसाहेबांनी चिंता करण्याचं काहीच कारण नाही. बाईसाहेबांचा आमच्या समशेरीवर विश्वास असला म्हणजे अस्मानासारखी अफाट असलेली बादशहाची फौज आम्हाला ओंजळभरच आहे. तिचा सफाचटा उडवायला आम्हाला कितीसा अवधी लागणार आहे. धनाजीराव तर आमच्याच तोलामोलाचे. पराक्रमाने ते आमच्या वरचढच आहेत. बाईसाहेब, प्रतापगड पडला तेव्हाची एक याद. धनाजीराव आम्हाला म्हणाले, 'पठ्ठे संताजीराव, व्हा पुढं. आम्ही डाव्या बगलीतनं जेर करतो खान आणि अस्मानातला वीजेचा लोळ सागरात घुसावा तसा धनाजीराव तुटून पडले खानावर. डुकर खळीस येतो ऐसा प्रकार झाला. खान बहुत जेर केला. पण हकनाक मावळा मारला जातोय म्हणून धनाजीरावांनी जावळीचा आश्रय घेतला. असे आमचे धनाजीराव. पठ्ठे जिगरीचे. वाघाच्या छातीचे.

[ राजाराम राजे आणि प्रल्हाद निराजीपंत बोलत येत आहेत—

**राजाराम :**—तेव्हा पंत, आम्ही पुरते गोंधळून गेलो आहोत. खानाने रसद तोडली. कुमक येण्याची आशा नाही. धनाजीरावानी पाठोपाठ दोनदा हमले केले तरी वेढा फुटत नाही. जेर होत नाही. गडावर आहेत ती तोलामोलाची माणसं. ( रंगमंचकावर येत. ) काही सुचत नाही पंत. पुरते फिकरमंद झालो आहोत आम्ही!

संताजी रामराजाना व पंताना मुजरे करतो. तसेच रामराजे व पंत महाराणीसाहेबांना मुजरे झडवितात तोच—]

हीही एक क्रांति !




असल्या हिंसात्मक निदर्शनाना मी मुळीच भीक घालणार नाही, तुम्ही आमरण उपवास कां करून पहात नाही ?








**येसूबाई** : यात भावोजींनी गोंधळून जाण्याचं काहीच कारण नाही.

**राजाराम** : वहिनीसाहेब!

**येसूबाई** : गडावर तोलामोलाची माणसं असली तरी सारीच्या सारी आम्ही खानाच्या पचनी पडू देणार नाही.

**प्र. नि** : आम्ही नाही उमजलो, बाईसाहेब!

**येसूबाई** : भावोजींनी चंदीचंदावर प्रांती निघून जावं. तेथून स्वराज्य रक्षणाचे प्रयत्न करावेत. संताजीराव स्वराज्यातच राहातील. आणि पंत, तुम्ही भावोजींच्या समवेत असावं.

**राजाराम** : आणि आपण?

**येसूबाई** : आम्ही!

**प्र. नि.** : मतलब?

**येसूबाई** : आम्ही आमचाही विचार केलाय, पंत!

**प्र. नि.** : म्हणजे बाईसाहेबांचा विचार इथं राहून गड झुंजत ठेवण्याचा तर नसावा!

**येसूबाई** : नाही पंत! वेढा लढविण्यात आता काहीच मतलब राहिला नाही.

**राजाराम** : आपल्या विचारांचा रोख—?

**येसूबाई** : आम्ही खानाच्या हवाली होणार आहोत, पंत!

**राजाराम** : वहिनीसाहेब!

**प्र. नि.** : आपला दुर्विचार होतोय हा, बाईसाहेब!

**संताजी** : पंत, आम्ही देखील तेच बजावत होतो बाईसाहेबांना. पण बाईसाहेबांनी मनाशी ठाम निर्धार केलाय.

**राजाराम** : नाही, नाही वहिनीसाहेब, आमच्या डोळ्यादेखत असं होऊ देणार नाही आम्ही. ( अगतिकपणे ) पंत!

**प्र. नि.** : श्रीच्या मनात काय आहे, त्याचा थांगपत्ता लागत नाही राजे! फार उमेदीनं आलो होतो आम्ही. पण सारी उमेद, जिद्द खच्ची पडली. ( सुस्कारत ) श्रीहरी! श्रीहरी!

**राजाराम** : तुम्हाला खानाच्या हवाली जाऊ देण्याइतकी अद्यापि मराठी समशेर बोथट झाली नाही, वहिनीसाहेब! हे संताजी आहेत, पंत आहेत, घनाजी आहेत, आम्ही आहोत आणि आमच्या देखत आम्ही तुम्हाला बादशहाच्या छावणीत जाऊ द्यायचं? अद्यापि आमचे बाहू विफल झाले नाहीत. वहिनीसाहेब, तुम्ही तर आमच्या राजमाता आहात. स्वराज्याची दौलत आहात. हिंदवीपातशाहीचं वैभव आहात. आम्ही आमच्या दौलतीचं सौभाग्य आमच्या देखत खानाच्या छावणीत जाऊ द्यायचं? भ्रष्ट होऊ द्यायचं? त्यापरीस आमचे हात तोडा. डोळे फोडा वहिनीसाहेब!

**येसूबाई** : भावोजी !

**राजाराम** : आजवर आमच्या हृदयावर अनेक प्रहार झाले. पण आम्ही सिर्फ तुमच्या शब्दाखातर, तुमच्या आजवरच्या प्रेमाखातर आम्ही ते वरच्या वर झेलून घेतले. चेंदळलेल्या जखमांतून उठत असलेल्या वेदना सहन करीत. कढ आवरीत. आसवं पापणीच्या आड लपवली ती केवळ तुमच्या शब्दासाठी. वहिनीसाहेब, आणि आता आम्हाला वेदनांच्या थारोळ्यात तडफडत ठेवणारहात तुम्ही! ( थबकून, निराळ्याच विचाराने ) पंत! आम्ही उद्या पहिल्या प्रहराला खानावर तुटून पडणार आहोत. एक तर वेढा उठवू, नाहीतर—

**येसूबाई** : भावोजी!

**प्र. नि.** : राजे!

**राजाराम** : पंत, पंत! आम्हाला टाळू नका आमच्या कर्तव्यापासून, आम्ही तयार आहोत समशेर झेलायला!

**प्र. नि.**: राजे! ह्या आपला निव्वळ अविचार होतोय. अविचारानं तलवारीची सरशी होत नाही. उलटपक्षी जीवावरच बेततं!

**राजाराम** : मग पंत, आमच्या डोळ्यादेखत वहिनीसाहेबांना खानाच्या छावणीत जाऊ द्यायचं?

**येसूबाई** : भावोजी! आम्ही खानाच्या हवाली होणार आहोत तो विचारानंच!

**राजाराम** : पण वहिनीसाहेब! —

**येसूबाई** : पंत, थोडा विचार केला असता तर आमचा मनोदय कळायला आपल्याला फारसा वेळ लागला नसता. भावोजींनी चंदीचंदावर प्रांती निघून जावं ते एवढ्याचसाठी, तशानं बादशहाची मनीषा काही अंशी धुळीला मिळेल. आणि आम्ही बादशहाच्या हवाली व्हायला मुस्तेज झालो तो एवढ्याच-

साठी की, बादशहाचा ओढा आमच्याकडे अधिक राहील. भावोजी चंदीचंदावर प्रांती सुखरूप राहून स्वराज्य रक्षणाचे उपाय योजतील.

**प्र. नि. :** ( विस्मयाने ) बाईसाहेब!

**राजाराम :** तुमचे प्राण धोक्यात टाकून आम्ही जिंदगी फुलवायची, वहिनीसाहेब? आम्हाला हे नामंजूर आहे. हे होणं नाही! होणार नाही!

**येसूबाई :** तुम्ही स्वराज्याचे छत्रपति आहात, भावोजी! आम्हाला आमच्या प्राणाहून तुमच्या प्राणाचं मोल अधिक वाटतं.

**प्र. नि. :** राजे! बाईसाहेबांचं धोरण रास्त आहे.

**राजाराम :** पंत!

**प्र. नि. :** स्वराज्याच्या जीवन-मरणाचा हा प्रसंग आहे. बाईसाहेब आज बादशहाच्या कैदी झाल्या तर त्यांना मुक्त करता येईल. पण राजे! पण—

**राजाराम :** बादशहा आम्हाला सुळी चढवील, हेच ना? आम्ही फिकरमंद आहोत आमच्या बलिदानासाठी. पण वहिनीसाहेबांना—

**प्र. नि. :** नाही राजे! चुकताहात आपण! बाईसाहेबांचा मसुदा आम्हाला रास्त वाटतो. तुम्ही चंदीचंदावर प्रांती निघून जावं. अशानं स्वराज्याचाच फायदा होईल. बादशाहाला हवे आहात फक्त तुम्ही. तुमच्यासाठी तो अधिकाधिक फौज तुमच्या मागावर पाठविल. स्वराज्य मोकळे होईल. मग आहेच आमचे सरनौबत आणि धनाजीराव उरलेल्यांना कबरस्थान दाखवायला. काय संताजीराव!

**संताजी :** आपलं धोरण रास्त आहे, पंत! महाराज, आपण बाईसाहेबांचा विचार ध्यानी घ्यावा. म्हणजे मोंगलांना आम्हाला दे माय धरणी ठाय करता येईल. म्हणजे स्वराज्य निर्वेध होईल.

**येसूबाई :** तेव्हा पंत, या प्रहरभरात आपण वाघदरवाजावाटे गड उतरावा. राजे शिर्के आम्हाला फितूर आहेत. सरनौबत, तुम्ही स्वराज्यातच असा. धनाजीरावांच्या दिलाला दिल द्या. बालराजे आजपासून छत्रपति नाहीत. भावोजी, तो अधिकार आपण स्वीकारावा. पंत, भावोजींना पन्हाळगडी राज्याभिषेक करावा. भावोजी, मन घट्ट करा. राजघराण्यात जन्म घेणाऱ्यांना अशा प्रसंगी पाषाण व्हावं लागतं. ( गदगदून ) पंत, भावोजींना आम्ही तुमच्या हवाली करतो आहोत. तुमच्या मायेची पांखर असो द्यावी त्यांच्यावर, सरनौबत, तुम्ही समशेरीचे फर्जंद आहात. मर्द आहात. तुमच्यासारख्यांना वेळोप्रसंगी डोळ्यात पाणी आणणं ठीक नाही.

**संताजी :** ( गदगदून ) बाईसाहेब!

**येसूबाई :** आमच्या शब्दाखातर तुम्ही छत्रपति व्हावं भावोजी! बालराजे आमच्यासंगे राहतील.

**राजाराम :** वहिनीसाहेब! —

**प्र. नि. :** बाईसाहेब!

**येसू :** तेवढाच आमच्या मनाला विरंगुळा आहे, पंत!

**प्र. नि. :** श्रीहरी! श्रीहरी!

**येसूबाई :** भावोजी—

**राजाराम :** वहिनीसाहेब!

**येसूबाई :** तुमच्यापासून आम्ही दूर असलो तरी तुमच्या पराक्रमाकडे, तुमच्या कर्तृत्वाकडे आम्ही मोठ्या आशेनं पाहात राहू! भावोजी, तुमच्या दादासाहेबांसारखे—

**राजाराम :** वहिनीसाहेब!

**येसूबाई :** पंत, जातो आम्ही!

**राजाराम :** थांबा वहिनीसाहेब! आजवर आम्ही तुमच्या आज्ञेचा अधिक्षेप केला नव्हता. पण आम्ही निक्षून सांगतो; छत्रपति बालराजेच राहतील. ' आम्ही त्यांचे कारभारी. राज्य त्यांच्याच नांवाने चालेल.

**येसूबाई :** भावोजी!

**राजाराम :** तर मग बालराजे आपले महाराज म्हणून आधी त्यांच्या नांवानं शपथा वाहणं!

**संताजी :** आम्हास बालराजांचं चरण वंद्य आहे. स्वराज्य महन्मंगलेच्या चरणी आमच्या जिंदगीचं पुष्प आम्ही कधीच अर्पण केलं आहे. शंभू महाराजांच्या वधाचा बदला आम्ही बादशहाच्या वधानंच घेऊ! हीच आमची प्रतिज्ञा आहे..

**प्र. नि. :** आता आम्ही राहिलो. स्वराज्याची सेवा करून हिंदवी रक्षण करण्याचं काम या प्रल्हाद निराजीपंतांचं आहे. ते आम्ही पार पाडू.

**राजाराम :** ( भारावून ) धन्य झालो आम्ही, धन्य झालो! तुमचा गौरव आम्ही कोणत्या शब्दानी करावा! दृष्ट लागेल अशी ही तुमची वीरत्वानं रसरसलेली वाणी. पराक्रमाचे जळते स्फुल्लिंग असे तुमचे हे शब्द ऐकून आज आम्ही कृतार्थ झालो. महाराष्ट्रमातेची कूस धन्य झाली आहे. पंत, सरनौबत आम्ही एक नांवाचे राजे आहोत. थोरल्या महाराजांच्या पोटी आम्ही जन्म घेतला म्हणूनच आम्हाला मोठेपणा आहे. पण बंधूनो, छत्रपतीचं मोठेपण अशा आपत्काली जगाच्या निदर्शनास आणून देण्याचं काम सर्वस्वी तुम्हासारख्या रणमर्दांवरच आहे पंत, हे खरे? ( दचकून ) पंत आपल्या डोळ्यात पाणी?

**प्र. नि. :** ( गोंधळून उपरण्याने डोळे पुसून ) छे छे! कुठे आहे पाणी?

**राजाराम :** आमची शपथ आहे तुम्हाला पंत! आमचा अपराध?

**प्र. नि. :** छे, छे! राजे, असं पाप आमच्या मनात कसं यावं? आपण थोर आहात. राजे आपण थोर आहात. मोठ्या दिलाचे आहात! शंभू महाराजांच्या वधानंतर बेवारशी पडलेलं हे साम्राज्य आपण उदार अंतःकरणानं त्यांच्या चिरंजीवांना दिलंत, यातच आपला थोरपणा आहे. धन्य राजे, धन्य तुमची! थोरल्या महाराजांच्या समवेतची एक याद आली आम्हाला. महाराज आम्हाला म्हणाले—तेव्हा पंत, रामराजांवर आमचा फार लोभ. फार फार हळव्या वृत्तीचे आहेत राजे! आमच्या मनात






होते—राज्य त्यानाच द्यावे! पण पंत, दौलतीचे दोन तुकडे होतात. कलह माजतो. दुःखाने दिल फाटून जातो. ऐसा प्रकार होतो. आयुष्य जळते ठेवून उभ्या हयातीत ही दौलत उभारली ती त्याचे तुकडे करण्यासाठी नाही. श्रीच्या मनात राज्य होणं होते ते झालं. ते उभारताना आम्हाला फार सायास पडले. ते दोन हातानी भंगावे असे आम्हाला नाही वाटत पंत! शंभू राजे आमचे थोरले पुत्र! रामराजांवर आमचा फार दिल्. आयुष्यात आम्ही काळकामाची गणितं बहुत हातावेगळी केली. पण हा साधा भागाकार आम्हास सुटत नाही! हेच आमच्या हृदयातलं फार फार मोठं शल्य आहे. आमचा पराभव आहे. (थबकून) पण पंत, रामराजांनी आमचं शल्य जाणले. आणि पंत, राजे आम्हाला म्हणाले—आबासाहेब, गादीच्या बाबतीत आम्ही निःस्पृह राहू. आम्ही दौलतीचा लोभ धरणार नाही. आम्हावर भरोसा असावा! (डोळ्यातले पाणी उपरण्याने पुसत) मोठा दिलाचे आहेत राजे! पुढं नांवास्वरूपास येतील तर आमचे हेच चिरंजीव!

**राजाराम :** (गदगदून) पंत!

**प्र. नि. :** कसूर माफ असावी राजे! पण आम्हाला हे कधी तरी आपणाला सांगायचंच होतं. ती पर्वणी आज लाभली. आणि दिल शांत झाला. तुम्ही थोर आहात!

**राजाराम :** पंत, आता आम्हाला किती लाजवाल!

**प्र. नि. :** सत्याचा गौरव सदैव करावा राजे! सत्याला मरण नाही. . सत्याला मरण नाही. . . चिरंजीव ते सर्वा-आधी. . सर्वा-प्रथम. .

असे पुटपुटत प्र. नि. जड पावलांनी जाऊ लागतात. (पाठोपाठ राजाराम, संताजी. तोच बालराजे शिवाजी येतात.)

**शिवाजी :** काकासाहेब——काकासाहेब—

**राजाराम :** राजे—राजे

**शिवाजी :** काकासाहेब, आम्हाला असे टाकून जाऊ नका हो.

**राजाराम :** राजे!

**शिवाजी :** आम्ही देखील तुमच्यासंगे येतो. आम्ही लहान असलो तरी समशेरीचे फर्जंद आहोत, काकासाहेब!

**राजाराम :** राजे—राजे!

**शिवाजी :** किती कठोर आहात काकासाहेब, तुम्ही!

**येसूबाई :** राजे!

**राजाराम :** नाही राजे, आम्हाला गेलंच पाहिजे. आम्हाला वाज्ञा आहे, राजे!

(मिठी सोडवून झपाट्याने निघून जातो. अगतिक होऊन बालराजे येसूबाईला मिठी मारतात.)

**शिवाजी :** मांसाहेब—

**येसूबाई :** राजे—राजे

(प्रकाशाचा कवडासा येतो. दोघे उजळून निघतात. येसूबाईची नजर प्रखर होते. त्यात विलक्षण सामर्थ्य आहे. आत्मविश्वासाची जरब आहे. तोच पडदा.) ● ● ●

# हिचकॉकची घंटा

--उत्तम शिरवळकर



**दुपारची** वेळ. संभाजी पार्कवर कसा गार वारा सुटला आहे. माणसं आपली फिरायला म्हटलं की, संध्याकाळीच बाहेर पडतात. बायका बरोबर घेतात, मुलं बरोबर घेतात आणि एकमेकाना धक्के मारीत कोडगेपणाने हिंडतात.

मग बायका आपापल्या नवऱ्यांकडे तिरक्या डोळ्यांनी पाहतात. कटाक्ष ! मुलांना हवं असतं आईस्क्रीम. ती खातात. वडिलांकडे आदराने पाहतात. मग वडिलांनाही प्रेमाचा पान्हा फुटतो. अन् मग मुलं आपली सारखी खातच असतात. बायका आपल्या सारखी बडबडच करीत असतात, नवऱ्यांचं लक्ष नसलं तरी. गंमतच !

तरुण येतात, तरुणींकडे पाहतात; तरुणी तरुणांकडे! ही उष्टया उत्तराची कहाणी संपते लग्नात ! मग पुन्हा आपली नवरा... बायको... मुलं... कटाक्ष... आईस्क्रीम.... ! !

मला आपलं दुपारीच बरं वाटतं. बरं म्हणजे काय ? काय बरं ? बरं म्हणजे बरं ! चांगलं ! की लगेच वाईट ! चांगलं... वाईट ! गंमतच आहे. असं खूपदा म्हटलं ना, की अर्थच कळत नाही. बघा म्हणून.

माणूस... माणूस.... माणूस ! खूपदा म्हणायचं. प्रत्येक उच्चाराबरोबर अर्थ आपला गायब ! थोडयाच वेळात माणूस म्हणजे काय हेच कळेनासं होतं. माणूसमधल्या 'णूस'वर जोर दिला ना, की फारच गंमत येते.

नुसतं 'णूस' 'णूस' 'णूस' म्हणावसं वाटतं.

वाटलं की म्हणायचं. डोक्यात गोंधळ उडतो.

मग जरा थांबायचं. हळू हळू माणूस शब्दाचा अर्थ डोक्यात उलगडू लागतो.

अरे, खरंच ! माणूस नाही का ? कळलं रे कळलं. आपल्याभोवती हिंडणारी ही तर माणसंच की. माणूस

....श्यामी बोलता बोलता माझ्याजवळ सरकते आहे. माझ्या छातीचे ठोके जलद पडू लागतात. श्वास घशातल्या घशात कोंडू लागतो ....श्यामी माझा हात हातात धरते, कुरवाळते....मग मात्र मला काहीच आठवत नाही. रक्ताच्या थारोळ्यात छातीतला एक इवलासा पक्षी जखमी होऊन पडलाय, असं वाटतं....

म्हणजे ते हेच. आपल्या भोवती हिंडणारं.

काय ? पुन्हा डोक्यात गोंधळ उडतो. मी आपला प्रत्येक माणसाकडे टक लावून पहात बसतो. मग मात्र गंमत हं !

प्रत्येक जण आपला हिंडतोय्. एक पाय एकदा पुढे, एकदा दुसरा पाय. आपापले पाय, आपापले हात, आपापली मान, नाक, तोंड... सगळं सगळं बरोबर घेऊनच लेफ्ट राईट !

कुणीच यापैकी काहीच विसरत नाही. सब कुछ साथमे !

प्रत्येकाला आपला एक एक उपयुक्त अवयव ! अगदी प्रत्येकाला हो. तो अवयव एकदम घट्ट चिकटलेला. हरवण्याची भीति नाही. ख्वाय् मजाय् ! खूप खूप हसू येतं. पण मी हासत नाही हं. हसलं की श्यामी म्हणते, "वेडच लागलंय् याला. इस्पितळात टाकला पाहिजे." मग मला फार फार भीति वाटते. रडूच यायला लागतं.

मग नाही हं गंमत वाटत. मग कीव वाटते. आपला प्रत्येक अवयव बरोबर घेतलाच पाहिजे हा जुलूम कां ? आय् से, व्हाय ?

मग मला आपला संतापच यायला लागतो. ओरडून प्रत्येकाला विचारावं असं वाटतं. अरे, कशाला हे ओझं बरोबर ? आँ ? एखाद्या वेळी तरी या ओझ्याशिवाय फिरायला बाहेर पडा !

पण शक्य नाही ना ते ! हे अवयव म्हणजेच माणूस !

What a bold statement !

हे अवयव म्हणजेच माणूस ? खरंय् का हे ? अगदी खरं ?

छे, छे, आणखी काही तरी आहे.

न दिसणारं, न सांगता येण्यासारखं ! हे आणि ते मिळून एक णूस... नाही, नाही माणूस.

ते न दिसणारं, न सांगता येण्यासारखं जे आहे ना, ते बेटं भलतंच सुळसुळीत आहे.

ते हेच शोधलं पाहिजे, पाहिलं पाहिजे, ओळखलं पाहिजे.

पण कसं ? हाऊ ?

शऱ्याचा आवाज कानात घुमतोय्.

'आहारनिद्रा भय मैथुनं च...'

'Code of conduct.'

शऱ्याच्या मते त्यांचं नाव 'माणुसकी'.

★★

तोही एक मोठा किस्साच आहे.

च्याआयला, आमच्या छातीच्या पिंजऱ्यात असं काही तरी आहे की, ते आवरलं नाही की माणुसकी बुडते. हीही एक गंमतच !

★★

रात्रीची वेळ. परीक्षा जवळ आलेली. रोज रात्री शऱ्याकडे अभ्यासाला जायचं. दोन अडीच पर्यंत सिगरेटी फुंकत अभ्यास करायचा.

अभ्यास म्हणजे सुद्धा एक गंमतच आहे. दहा पाच पुस्तकांतलं वाच वाच वाचायचं. लक्षात ठेवायचं. आणि एक दिवस छापील प्रश्नपत्रिका हातात पडली की धडाधड् ते पेपरात उतरून काढायचं. जो जास्त लक्षात ठेवील तो हुशार. मग त्याला पोत्यांनी मार्क. चांगली नोकरी... खूप पैसा. माणूस म्हटलं की पैसा हवाच.

आपण वाण्याकडे जायचं. म्हणायचं, 'गहू द्या' की लगेच वाण्याने हात पुढे करायचा. आपण त्याच्या गलेलठ्ठ हातावर नोटा, नाणी काही तरी ठेवायचं. वाण्याने ते मोजून घ्यायचं. उरलेले सुट्टे पैसे आपल्याला परत द्यायचे. ते आपणही मोजून घ्यायचे.

पैशांच्या बाबतीत विश्वास नाही बरं का.

वाण्याने लगेच आईस्क्रीमवाल्याला बोलवायचं. त्याने हात पुढे करायचा, याने त्याच्या हातावर नाणी ठेवायची. त्याने आईस्क्रीम द्यायचं. आईस्क्रीमवाल्याने दूधवाल्याच्या हातावर नाणी ठेवायची आणि दूधवाल्याने वैरणवाल्याच्या !

ख्वॉय मजेदार चक्र आहे.

त्यापेक्षा कुणीच कुणाला काही दिलं नाही तर ? पण तसं चालत नाही.

पैसा हा द्यावाच लागतो.

त्यामुळे गंमत येते.

पैसे देताना आणि घेताना माणूस किती मजेदार दिसतो.

खूप खूप पैसा मिळाला ना की माणूस श्रीमंत. कमी मिळाला की गरीब !

मग श्रीमंत गरिबांवर दया करतात. त्यांच्याकडून काहीही न घेता त्यांना पैसे देतात. त्याला 'दान' म्हणतात. दान करणारा माणूस फार श्रेष्ठ असतो. असं घेणाऱ्यांनी आज अनेक शतके सांगून ठेवलं आहे.

'मुळीच दान न करणारा माणूस नादान'. हा 'जोक' आहे. प्राध्यापक दांडेकर दरवर्षी हा जोक करतातच. मुलेही आपली दरवर्षी हसतात. माणूस हसला की बरा दिसतो. पण मला फार कमी हसू येतं.

शऱ्या म्हणतो, 'अन्नदानासारखं मोठं पुण्य नाही.' तेही खरंच ! बारा वाजले ना, की पोटात अगदी कसंतरीच व्हायला लागतं.

श्यामी शाळेतून आली की मस्त स्वैंपाक करते. सगळ्यांच्या घरांत स्वैंपाक होतोच. मग माणसं खातात. पैसा देऊन वस्तू आणायच्या आणि त्या शिजवून दाताखाली चावायच्या आणि पोटात ढकलायच्या. खाण्याची क्रिया पूर्ण ! मग खरंच बरं वाटतं. या बरं वाटण्याकरता किती धडपड, किती कष्ट, किती स्पर्धा !

★★

मात्र सगळंच 'बरं वाटणं' हे चांगलं असतंच असं नाही बरं का. काही काही



अनुक्रमणिका

'बरं वाटणं' हे माणसाच्या 'code of conduct' मध्ये बसत नाही. मग ते आवरावं वागतं. उरात सल घेऊन वागावं लागतं.

★★

रात्री दोन अडीचची वेळ. अभ्यास करून करून अंग कसं आंबून गेलेलं असतं. शऱ्या तेथेच आडवा होतो आणि मिनिटात घोरायला लागतो. मला मात्र झोप येत नाही. वाचलेलं सारं डोळ्यांपुढे नंगानाच घालतं. डोक्यात ठणका सुरू होतो, शऱ्याचं घोरणं ऐकवत नाही. मी शऱ्याकडे पाहात बसतो.

निजला की माणूस अगदी निष्पाप दिसतो.

★★

तोच जिन्यावर पावलं वाजतात. शऱ्याची सगळ्यात थोरली बहीण श्यामी वर येते. 'का रे, झाला का अभ्यास ?'

'हो.'

'मग झोपत कां नाहीस ?'

'लागतच नाही हो !'

'चल, चहा करून देते तुला.'

मी आपला मुकाट्याने तिच्या मागोमाग स्वैंपाकघरात जातो. ती स्टोव्ह पेटवते. तिची हालचाल पाहात स्वस्थपणे बसताना मी अस्वस्थ होतो. तिचं भरदार शरीर डोळ्यांपुढे एखाद्या इंद्रधनुष्याप्रमाणे चमकतं. तिशीला आलेली श्यामी एम्.ए.एम्.एड्. आहे. एका मुलींच्या शाळेची मुख्याध्यापिका. शिकण्या-शिकवण्यात लग्न करायला सवड न मिळालेली ! निवर झालेली श्यामी त्या रात्रीच्या प्रकाशात कां कुणास ठाऊक पण मोहक वाटते आहे.



ती चहाचा कप माझ्या हातात देते. तिच्या बोटांच्या स्पर्शाचा चटका बसतो. गरम चहा पोटात जाताच खूप हुशारी वाटते. मरगळलेलं शरीर सावध होतं.

'तुला झोप आली ?'

'नाही हो. झोप लागतच नाही.'

'चल मग, आपण गॅलरीत जाऊन गप्पा मारू.'

रस्ता निर्मनुष्य आहे. दिवसा गजबजलेला हा भाग रात्री मोठा मोहक दिसतो आहे. श्यामी बोलता बोलता माझ्याजवळ सरकते आहे. माझ्या छातीचे ठोके जलद पडू लागतात. श्वास घशातल्या घशात कोंडला जाऊ लागतो. अंग थरथर कापू लागतं.

श्यामी माझा हात हातात धरते, कुरवाळते. मग मात्र मला काहीच आठवत नाही. गरम रक्ताच्या थारोळ्यात छातीतला एक इवलासा पक्षी जखमी होऊन पडलाय् असं वाटतं.

सहज दाराकडे लक्ष जातं. शऱ्या दारात अवाक् उभा आहे. त्याच्या डोळ्यांतून आग बाहेर पडत आहे.

श्यामी माझ्या मिठीतून बाहेर पडून अचानक स्फुंदू लागते. शऱ्याच्या गळ्याला मिठी मारते. रडत, स्फुंदत म्हणते, "शरा, राजाने मला भ्रष्ट केलं रे."

तिचे शब्द तापलेल्या तेलाप्रमाणे कानात घुसतात. मेंदूत ॲटम बॉंब पडल्याप्रमाणे गडबड होते.

'भ्रष्ट, भ्रष्ट, भ्रष्ट !' भलताच लठ्ठ शब्द !

अचानक मला आपलं हसूच येऊ लागतं मी जीवाच्या आकांताने ते दाबतो. तोच शऱ्याचा हात माझ्या गालावर उमटतो.

मग मात्र मला हसू आवरत नाही. एक माणूस दुसऱ्या माणसाला मारतो हीही एक गंमतच. आपला हात उचलायचा आणि दुसऱ्याच्या शरीरावर जोरात आपटायचा. म्हणजे दुसरा दुःख करतो आणि अर्थातच आपल्याला सुख ! मी आपला हासतच सुटतो. शऱ्या भडकतो. कोपऱ्यातली काठी घेण्यासाठी धावतो. आम्ही गुल् !

अवयव बरोबर असल्याचा फायदा.

मी घरी येतो. पण दोन तीन दिवस डोक्यात फटाक्यांचे आवाज होत असतात. झोप मुळीच लागत नाही. शेवटी झोपेच्या गोळ्या घेतो. तब्बल दोन दिवसांनी जागा होतो. डोक्यातले आवाज जरा कमी होतात.

तोच दुपारच्या डाकेला श्यामीचं पत्र हजर !

'माझ्या लाडक्या राजास'

च्याऐला, गंमतच आहे एकेक.

'मला क्षमा कर. आपण लग्न करू.'

लग्न !

जे दोन दिवसांपूर्वी केलं तसं करण्याचा इतर माणसांचा परवाना.

Code of conduct.

मी खूप खूप हासतो. मी नेहमीच हासतो म्हणा !

★★

तीस वर्षांची श्यामी आणि एकवीस वर्षांचा मी ! दोघांनी मुंडावळ्या बांधल्या आहेत, वरात निघाली आहे, एकमेकांना घास घातले आहेत.

ते दृश्य डोळ्यांसमोर दिसू लागतं.

हासून हासून पोटात कळ येते.

लग्न झालं की दोघांनी सगळ्यांच्या परवानगीने तसं वागायचं. शी !!

गंमत अशी की, सगळ्यांना सगळं माहीत असतं. पण कुणी बोलून दाखवत नाही.

हेही बरंच !

नाही तर पावित्र्यविडंबन होतं हं !

पावित्र्य ! हा दुसरा वजनदार, जड शब्द.

पावित्र्य हे असं मुद्दाम राखायचं असतं. राखलं नाही की लगेच ते खतम् !

मग मुलं होतात. ती मोठी होतात. त्यांची लग्नं होतात. त्यांना मुलं होतात.

And so on.

सगळं कसं पवित्र, पवित्र !

★★

एकदा संध्याकाळी मला बागेत गाठून श्यामीही असंच बरंच काहीतरी बोलत होती.

'राजा, माझ्या पावित्र्याचं रक्षण आता तूच केलं पाहिजेस.'

म्हणजे काय ?








पण मग ती खूप खूप रडली. असं कुणी रडलं ना की पोटात कसंतरीच व्हायला लागतं. कुणाच्या तरी डोळ्यात आपलं बोट खुपसलं जात आहे असं वाटायला लागतं.

'राजा, माझं तुझ्यावर फार फार प्रेम आहे रे.'

असली वाक्यं खरं म्हणजे मला आवडतच नाहीत. पण एका माणसाने दुसऱ्या माणसासमोर इतक्या करुण स्वरात गयावया करणं जरा चमत्कारिकच. घशात काही तरी अडकल्यासारखं होतं. मी आपला ती जे जे विचारील त्याला हो हो करीत सुटतो.

मग एकदाचं आमचं लग्न झालं. मला फार फार लाज वाटत होती. सारखं वाटायचं, कुणी तरी आपल्याला 'भलतंच काही तरी' विचारणार.

पण नाही. माणूस जात एकूण सूज्ञच. पण प्रत्येक जण आपला आमच्याकडे टक लावून पहायचा. अस्वस्थ वाटायचं.

एकंदरीत लग्नात मजा आली बुवा. आपल्याला तर टेरिलीनचा सूट मिळाला. आणखी काय हवं ?

सगळ्यात गंमत म्हणजे श्यामीने फॉर्मवर स्वतःचं नांव लिहिलं :

सौ. श्यामला राजेश दिघे.

आपल्याला फार लाज वाटली बुवा, एखाद्या 'बापा'सारखं आपलं नांव पुढे पाहून !

श्यामीही तशी सूज्ञच.

मी एक दोन वर्षं अभ्यास करून पदवी पदरात पाडून घ्यावी असं तिनं सांगितलं.

काय वाईट आहे ?

लग्नापरी लग्न आणि जबाबदारी नाही.

श्यामीची नोकरी आपली चालूच.

खटावकर मास्तरही तसा चांगला माणूस हं. सहा फूट उंचीचा हा तालीम मास्तर माझ्या बापासारखा. पण किती बरोबरीच्या नात्याने वागतो.

माझी काळजी तरी किती.

रात्री गप्पा मारीत बसण्याचा श्यामीला नाद आहे. पण माझ्या अभ्यासाचा वेळ फुकट जाऊ नये म्हणून ही जबाबदारी त्याने उचलली. नाही तर पंचाईतच!

श्यामीशी मी काय गप्पा मारणार ?

ती समोर असली ना की, मला आपलं कसंतरीच होतं.

रात्रीचं सगळं वागणं आठवायला लागतं आणि मग श्यामीचा आपण फार मोठा अपराध केलाय्, असं काही तरी वाटतं.

खटावकर तसा तगडा माणूस.

श्यामीही नाही म्हटलं तरी त्याला भिते. एकदा रात्री मी सिनेमाला जाणार होतो. श्यामी म्हणे, 'काही नको. शऱ्याकडे जा अभ्यासाला.'

खटावकर माझी बाजू घेऊन उखडला,

'जाऊ दे ग, कां त्याला आडवतेस ?'

श्यामीने मुकाट्याने पांचची नोट माझ्या हातावर ठेवली.

ये ! ! वा रे शेर !

मग मी आपला नेहमी खटावकरची ढाल पुढे करू लागलो. माणूस उपयोगी !

शेजारपाजारची माणसं मात्र गमतीदार हं ! म्हणायची, 'काय राजाभाऊ, काय म्हणतोय् तुमचा नवा संसार ?'

संसार काय म्हणणार विचारा ?

"तुमच्या मुलाबाळांना शरीर संपदा चांगली लाभणार बरं का ?"

अरेच्या, आम्ही मुलं होण्यासारखं काहीतरी वागतो, हे यांनी ओळखलं तर !

मी आपला नुसताच लाजतो.

शेजारी हास हास हासतात.

सांगितलं नाही ? माणूस हासताना आपला चांगला दिसतो.

मीही हासतो.

ते अजून हासतात.

मी पण.

असं आपलं नेहमी नेहमी चालतं.

गंमतच.

रात्री अकराचा सुमार. सिनेमाची तिकिटं खलास !

हिंडत हिंडत घरी येतो.

खिडकीच्या फटीतून आधी श्यामी जागी आहे की नाही हे पाहतो.

श्यामी आणि खटावकर मिठीत.

डोक्यात 'हिचकॉकच्या चित्रपटातल्यासारखी घंटा' जोरात वाजू लागते.

मी आपला जोरजोरात हासतच सुटतो.

श्यामी आणि खटावकर अगदी वेडसर दिसतात. त्यांचे चेहरे कुत्र्यांसारखे वाटतात.

मला हासू आवरत नाही.

माझ्या हासण्याने सारी बिऱ्हाडं दारात गोळा होतात.

खटावकर मला घरात ओढून नेतो.

मी आपला हासतोच आहे.

ते दृश्य पाहिलं असतं ना तर कुणीही असंच हसलं असता.

What a joke !

शऱ्या विचारा उगीचच रडतो. म्हणतो, 'राजा, तुझ्याबद्दल गैरसमज झाला रे माझा.'

पण मला आपली गंमतच वाटते.

डोक्यात 'हिचकॉकची घंटा' वाजू लागली ना की मी आपला खूप हासतो.

डोक्यात गुदगुल्या होतात.

पण शूsss ! Don't laugh !

श्यामी म्हणते, 'इस्पितळात टाकावा याला !'

वारे वा !

मी काय केलय् ?

Why not stop that bloody Hitchcock.

त्याने आपली आमच्या डोक्यात घंटा बडवून गुदगुल्या कराव्यात आणि आम्हालाच शिक्षा ? सगळी गंमतच हं !

●●●

**आणखी एक क्रांति**



सिगारेट मुर्दाबाद ! गुडगुडी जिन्दाबाद !



—प्रभाकर अत्रे




**ग्रीनरूमच्या** झगझगाटात सुरेंद्र रंगायला बसले होते. समोर खूप मोठा आरसा होता. टेबलावर रंगाच्या डब्या पडल्या होत्या. पाण्याचा स्प्रे होता. मागल्या बाजूला तार होती. तिच्यावर खूपसे हँगर्स लावलेले होते. हँगर्सवर त्यांचे कपडे लावले होते. शेजारी इतर. काही नट रंगत बसले होते. ते गप्पातही रंगले होते. त्या गप्पात काही हलके फुलके विनोदही फसफसत होते. चहाचे कप भरले जात होते. धुराडीही चालू होती. मधूनच कुणीतरी येऊन नाटकातल्या पदांच्या अधल्यामधल्या ओळी गाऊन जात होता. त्याच्या त्या गाण्याला आपण जणु प्रेक्षकात वसलो आहोत अशा थाटात काही जण टाळ्या देत होते. सुरेंद्र आरशात पाहून रंग लावत होते. आज खूप दिवसानी ते रंगपटात आले होते. तो आरसा, ते कपडे, ते वातावरण, ते रंग, त्या टाळ्या आणि ते विनोद ह्या साऱ्यांशी त्यांचे फार जवळचे नाते होते. त्यातले काहीही त्याना अपरिचित नव्हते. पण आज मात्र त्याना ते सारे नवे, खास, आगळे असे वाटत होते. ते काही प्रथमच रंगत नव्हते. पण त्याना आज जणु आपण प्रथमच रंगायला बसलो आहोत असेच त्याना जाणवत होते. पण आपली रंगभूषा चांगली व्हावी, परिपूर्ण व्हावी ह्यासाठी ते मुद्दामच आधी रंगायला बसले होते. त्यासाठी ते आज नाट्यगृहातही आधी आले होते. ते आले तेव्हा रंगपटात कुणीसुद्धा आले नव्हते. कंपनीचा गडी होता. नाट्यगृहात फक्त द्वाररक्षक आले होते. खुर्च्यांवर पाय ताणून, धूम्रपान करीत ते बसले होते. नाट्यगृहाच्या प्रेक्षागारात सुरेंद्र गेले तेव्हा ती माणसे उठली होती. त्यानी त्याना वाकून नमस्कार केला होता.

**....आलापीनी हॉल धुंद बनला होता. दाराच्या एका कोपऱ्यात सुरेंद्र अंग चोरून बसला होता. बुवांचे गाणे संपले. त्यानी तंबोरा खाली ठेवला. रुमालाने तोंड पुसले. नजर सहजच दाराकडे वळली. कोण ते !**

आणि त्यांच्या प्रकृतीची आस्थेवाईकपणे चौकशी केली होती. त्यांचे गाणे आज ऐकायला मिळणार होते म्हणून आनंदही व्यक्त केला होता. प्रेक्षागारातल्या सर्वात पुढच्या रांगेतल्या कोचावर बसून त्यानी मखमालीच्या पडद्याला वंदन केले होते. आणि शेजारच्या नामफलकाकडे त्यांचे लक्ष गेले होते. त्या फलकावर सर्वप्रथम त्याचे नांव लिहिले होते. त्यांच्यासंबंधी लिहिताना त्याने लिहिले होते: "संगीत सुधाकर सुरेंद्र आपल्या अत्यंत लोकप्रिय भूमिकेत प्रदीर्घ काळानंतर परत चमकणार !"

तो फलक, त्या फलकादरची ती भलावण, प्रेक्षागारातल्या द्वाररक्षकानी व्यक्त केलेली सद्भावना तिकिटांच्या दारांशी गेले तीन दिवस धरणे धरून बसणाऱ्या रांगा, त्या रांगातल्या माणसांच्या चेहऱ्यावरचे ते भाव सारे काही त्याना आठवले आणि त्यानी पावडरचा पफ हळुवार हातानी आपल्या चेहऱ्यावर फिरवला. भुवया कोरल्या. लिपस्टिक लावली. पुन्हा एकदा आरशात आपली छबी त्यानी न्याहाळली. आणि धैर्यधराच्या स्वप्नात ते रंगले. बराच वेळ ते त्या आरशासमोरच उभे राहिले. आरसा अंधुक होत गेला. आणि गळ्यात पाटीदप्तर अडकवलेला एक आठ वर्षांचा मुलगा त्या आरशाच्या चौकटीतून थेट तशाच पोषाखात, गळ्यात पाटी दप्तर अडकवूनच बाहेर आला आणि त्याना म्हणू लागला "मला ओळखलं ?"

"ओळखलं" सुरेंद्र म्हणाले.

"कोण ते सांगा."

"सुरेंद्र नारायण वर्तक."

"इयत्ता."

"इयत्ता नेमकी आठवत नाही." कारण मी अभ्यास असा कोणत्या एका इयत्तेचा केलाच नाही."

"पण शाळेत तर रोज जात होतास."

"ते एक नाटक होतं. घरच्या माणसांसाठी केलेलं."

"आणि आज काय करतो आहेस ?"

"नाटकच ! साऱ्यांसाठी. मित्रांसाठी, रसिकांसाठी, चाहत्यांसाठी."

"बस्स ! येवढंच ?"

"नाही ! येवढंच नाही !"

"मग काय ?"

"खरं म्हणजे स्वतः साठी ! स्वतःच्या आत्मिक समाधानासाठी. तृप्तीसाठी ! खरं म्हणजे. . . पण जाऊ द्या झालं !"

"जाऊ द्या कां ? सांगा की !"

"खरं म्हणजे हे शब्द मी उच्चारले ना ते सुद्धा काही खरे नाहीत बरं का ! तेही खोटं. अपुरं. खरं म्हणजे जे खूपसं काही शब्दात व्यक्त करता येत नाही अशा कशाच्या तरी गोष्टीसाठी मी आज रंगतोय्. रंगणार आहे. गाणार आहे. शब्द हे उपरे, खोटे, अपुरेही !

"अच्छा ! मग तू आज रंगणार–गाणार तर !"

"होय ! होय ! !" असं म्हणत सुरेंद्रानी आपल्या हातातली लिप्स्टिकची कांडी खाली ठेवली आणि ते उठले. त्यांच्या गात्रा-गात्रातून हुंकार निघत होते. "आज मी रंगणार. आज मी गाणार !" त्यानी कपडे घालण्यापूर्वी हात धुतले. हात पुसता पुसता त्यानी पुन्हा एकदा आरशात पाहिले. धैर्यधराची रंगभूषा तर चांगली झाली होती. आरशातली छबीही त्यांच्याकडे पहात होती आणि म्हणत होती "यशस्वी व्हा सुरेंद्र" ते 'थँक्स' म्हणाले. 'बघा आरसा सुद्धा तेच म्हणतोय्' असं वाक्य त्यांच्या कानात कुणीतरी गुणगुणून गेलं. त्याना एकदम आठवण झाली ती मालविकेची ! मालविका सरपोतदार ! त्यांच्या कलेची चाहती अशी मालविका ! ती आली होती. श्रद्धेने व अभिमानाने आली होती. तिनेही सुरेन्द्राला सुयश चिंतिले होते आणि ती म्हणाली होती "सुरेन्द्र, तुम्ही कलेचे किमयागार आहात. मला विश्वास वाटतो की, तुम्ही रंगभूमीवर आज काहीतरी चमत्कार घडवून दाखविणार आहात." खरंच मी काही किमया करून दाखवू शकेन ? एखादा चमत्कार मला घडवून दाखविता येईल ? माझे गाणे मला दगा तर देणार नाही ? माझे शरीर शेवटपर्यंत साथ देईल ? मी पुन्हा वन्समोअरचा पाऊस पाडू शकेन ? मला नाटक पेलेल ? लोकाना पूर्वीसारखाच माझा अभिनय मोहवील ? अनेक प्रश्नचिन्हे घेऊन मी पुन्हा आज रंगभूमीवर उभा राहतो आहे. मला चेहरे दिसताहेत तेही प्रश्न-चिन्हांकितच आहेत. मलाही उत्सुकता छळते आहे आणि त्यानाही ती लागून राहिली आहे. पण मी जर किमया करू शकलो तर—

तर मालविकेला खराखुरा आनंद होईल. ती आनंदाने नाचेल. मध्यंतरात ती रंगपटात येईल. माझ्याशी आवेगाने हस्तांदोलन करील. गेंदेदार पुष्पगुच्छ ती मला भेट म्हणून देईल. आणि म्हणेल "सुरेन्द्र, आज तुम्ही बहार केलीत. खरंच तुम्ही सुरांचे जादुगार आहात. खूप वर्षांचं जणु पारणं फेडलंत" पण. . .

"धैर्यधरजी, पहिली घंटा झाली बरं का. कपडे चढवा. बाहेर तोबा गर्दी उसळली आहे. तिकिटे संपली आहेत असं सांगितलं तरी लोक ऐकायला तयार नाहीत. म्हणतात "आम्हाला सुरेंद्राना पहायचंय्. त्यांचं एखादं तरी गाणं ऐकायचंय्" मी त्याना म्हटलं की, धीर धरा. उद्या पुन्हा एखादा प्रयोग लावतो. लोक म्हणतात की आजच्या प्रयोगाचं बोला. उद्याचं कुणी पाहयलंय् ?"

"खरंच ! सारी तिकिटं गेली ?"

"भारी दराची कालच गेली होती."

"अरेरे !" येवढाच उद्गार सुरेंद्रांच्या तोंडून निघाला. असा उद्गार ते पहिल्यांदाच काढत नव्हते. गेल्या पंधरा वर्षातल्या अनेक







प्रयोगांच्या वेळी तिकिटे न मिळालेल्या प्रेक्षकांबद्दल त्यानी असाच उद्गार काढला होता.

"जाऊ द्या झालं ! कपडे करा" असं म्हणत निर्माता निघून गेला. आणि सुरेंद्रांचे वृद्ध आई वडील त्याना भेटायला म्हणून आत आले. त्याना पाहताच सुरेंद्राना गहिवरून आले. सारे जग त्याना चाहत होते. टाळ्या देत होते. फक्त त्यांच्या आईवडिलांची टाळी मात्र येत नव्हती. आजवर कधी आली नव्हती. ती यावी अशी इच्छा सुरेंद्रानी वारंवार व्यक्त केली होती. त्याना आमंत्रणे पाठवली होती. कंपनीची गाडी पाठवली होती. एकदोनदा तर त्यांच्याच गावी कंपनीचा मुक्काम असताना ते स्वतः गाडी घेऊन त्याना आणायला गेले होते. त्यांच्या पाया पडून चलण्याबद्दल विनविले होते. पण ती दोघे कधी आली नव्हती. पण आज ती समोर दिसत होती. सुरेंद्रांचा आनंद गगनात मावेना. ते धावतच त्याना सामोरे गेले. त्यानी त्याना वाकून नमस्कार केला. "अण्णा बसा. माई बैस." त्यांना दोन खुर्च्या पुढे केल्या. काय बोलावे हे त्यांना कळेना. "बरं झालं तुम्ही आलात. मला खूप आनंद झाला. साऱ्यांचं प्रेम मला मिळालं. पण तुमची मात्र अढी होती त्यामुळे मी दुःखी होतो. फार दुःखी होतो" असं म्हणत सुरेंद्र एकदम गप्प झाले. त्यांचे डोळे पाण्याने भरले. त्या पडद्यातून काही अंधुक आकृति दिसू लागल्या. मोठ्या उमेदीने समारंभपूर्वक त्यांच्या वडिलानी त्याना शाळेत घातले होते. नवे कपडे, नवी पुस्तके घेऊन दिली होती. हायस्कुलात जाईपर्यंत वाट सरळ होती. हायस्कूल गावाबाहेर होते. रोज सकाळी सारे कार्यक्रम करून ते शाळेत जात. अभ्यासात आणि खेळात लक्ष घालीत. इतर मुलांबरोबर थट्टा-विनोदात भाग घेत. आणि एक दिवस मुलांबरोबर जात असताना एका इमारतीपाशी त्यांचे पाय थबकले. मुलांनी चलण्याचा आग्रह केला. पण त्यांचे पाऊल पुढे पडेना. कुणीतरी आपल्या पायात मणांची बेडी घातली आहे की काय असे त्याना वाटू लागले. त्या इमारतीच्या पहिल्या मजल्यावरच्या सभागृहातून गाण्याचे मधुर आलाप ऐकू येत होते. सुरेंद्रानी चांगलं गाणारे कीर्तनकार ऐकले होते. श्रद्धेने ऐकले होते. पण त्यादिवशी त्यानी जी सुरावट ऐकली तिने ते भारावून गेले. एकदा वाटे वर जाऊन गाणे ऐकावे. पण धीर झाला नाही. त्या सायंकाळी ते घरी बऱ्याच उशिरा गेले. पण गाणे ऐकत थांबलो हे सांगण्याचा त्याना धीर झाला नाही. त्यानंतर लागोपाठ शाळा सुटायच्याच वेळेला त्या घरी ती सुरावट रंगे आणि सुरेंद्रांची पावले थबकत ! त्यातून घरी जायला उशीर, वडिलांचा संताप, आईची चिंता ह्या गोष्टी वाढत. एक दिवस सुरेंद्रानी धीर केला आणि ते त्या इमारतीच्या पायऱ्या चढून वर गेले. दारातून त्यानी त्या सभागृहाचे वैभव न्याहाळले आणि त्या गाद्यांवर बसण्याची आपली लायकी नाही हे ध्यानी घेऊन ते दारातच बसून राहयले-जमिनीवरच !!

बुवांचे गाणे संपले. त्यांनी तंबोरा खाली ठेवला. रुमालाने तोंड पुसले आणि सहजच त्यांचे लक्ष दाराकडे गेले. सुरेंद्राना पाहताच बुवा म्हणाले "कोण ते ?" सुरेंद्र उठले. पण आत जायचा धीर त्यांना झाला नाही.

"आत ये !" बुवांची आज्ञा कानी पडताच सुरेंद्र आत गेले. बुवांनी त्यांची आस्थेने चौकशी केली. त्यांच्या गाण्याच्या वेडाने तेही भारावून गेले. 'मग तुझी काय इच्छा आहे ?"

"तुमचं गाणं मोकळ्या मनाने ऐकण्याची ! गेले काही दिवस मी खालच्या पायरीवर बसून ऐकत होतो. मी इथे येत जाऊ ?"

"नुसतं गाणं ऐकायचंय ? शिकायचं नाही ?"

"शिकायचंय् ! ऐकून ऐकून शिकेन."

"आजवर असं शिकलास ?"

"थोडंसं शिकलो."

"मग म्हणून दाखव !"

सुरेंद्रानी नाटकातली दोन पदं म्हटली. त्याना ताल ठाऊक नव्हता. रागांची त्यांची ओळख नव्हती. त्याना कळले होते फक्त सूर आणि लाभला होता गाता गळा ! त्यांचे गाणे ऐकून बुवा म्हणाले "देवाने चांगलं दिलंय्. जपलं पाहिजे. वाढवलं पाहिजे."

"जपेन. वाढवेन."

"येत जा रोज, पण शाळा चुकवायची नाही. वडिलाना विचारलंस ?"

"त्याना आवडत नाही."

"गाणं कीं तुझं गाणं शिकणं ?"

"दोन्हीही !"

"मग कसं काय करणार ?"

"तरीही मी शिकणार ! तुम्ही मला शिकवाल ? मी फी देऊ शकणार नाही."

"मी कुठे मागितली आहे ? येत जा उद्यापासून !"

दुसऱ्या दिवसापासून सुरेंद्र तिथे गाणे शिकायला जाऊ लागले. त्याना त्या सुरांचे वेड लागले होते. त्यामुळे वर्गात इतिहास, भूगोल गणीत ह्या विषयांच्या वेळीही ते कुठल्या तरी तंद्रीत राहू लागले. शिक्षकांच्या ते लक्षात आले तेव्हा तेव्हा त्याना शिक्षा होई. पण त्या शिक्षा सुरेंद्रानी कधी मनावर घेतल्या नव्हत्या. गाण्यामुळे त्याना घरी जायला उशीर होत होता. प्रत्येक वेळी काही तरी नवनवीन थापा ते मारीत राहिले. काही दिवस ते खपले. पण जेव्हा वेळ आली तेव्हा मात्र त्यानी वडिलांना सांगून टाकले "मी गाणं शिकतोय् ?"

"शाळेत जातोस ?"

"जातो !"

"मग गाण्याची फी कुठे नेत नाहीस ती ?"

"फी पडत नाही ! गुरुजी माझ्या गळ्यावर खूप आहेत.

"पण घराण्यात आजवर कुणी असले धंदे केले नाहीत."

"गाणं शिकणं म्हणजे धंदे करणं नाही."

"ती त्यांची सुरुवात असते. तू अजून लहान आहेस. तुझी काळजी आम्हालाच घेतली पाहिजे. उद्यापासून मी येत जाईन तुला न्यायला. उगाच भलते व्याप नको."

दुसऱ्या दिवसापासून त्यांचे वडील त्याना शाळेतून न्यायला, आणायला जाऊ लागले. त्यानी मास्तरानाही त्यांच्यावर लक्ष ठेवायला सांगितले होते. पहिल्या, दुसऱ्या दिवशी त्या क्लासच्या इमारतीपुढून ते खालच्या मानेने गेले. तिसऱ्या दिवशी त्यांची पावले रेंगाळली. चवथ्या दिवशी "मी आता जाऊन येतो" म्हणून ते वर सटकले. आणि बुवांच्या समोर जाऊन बसले. त्यानी तंबोरा काढला आणि नव्याने शिकवलेल्या रागाची तालीम सुरू केली. बुवा त्याना काही नव्या हरकती सांगू लागले. खाली वडील उभे होते, ते कंटाळले आणि तावातावाने वर आले. सुरेंद्रांचे लक्षच नव्हते. ते केव्हाच सुरात बुडून गेले होते. वडील गॅलरीतून त्यांचे गाणे ऐकत राहिले होते आणि नंतर एकदम आत आले आणि म्हणाले, "ठेव तो तंबोरा खाली" बुवा चपापले. पण सुरेंद्रानी सूर सोडला नाही. "ठेव म्हणतो ना !" पुन्हा वडील गरजले.

"बसा ना ! निदान ऐका तरी मुलाचे गाणे. एकदा गाणे ऐकाल तर तंबोरा कधीच खाली ठेवू नका असे म्हणाल."

"ऐकत बसायला वेळ नाही. आमच्या घराण्यात असली चाल नाही."

"पण ही चांगली चाल आहे. कलेची. परमेश्वराच्या जवळ जाण्याची. साऱ्या भेदांवर मात करण्याची !"

"मला प्रवचन नकोय्. मला माझा मुलगा हवा आहे."

"घेऊन जा ना ! मी त्याला बोलावलं नाही. तो आपण होऊन आला आणि गायला लागला."



# ऑफीस

–पिनांना हात लागला नाही. पावडर फारशी ढवळली गेली नाही. कपाटातल्या विविधरंगी मोहक फ्रॉक्सचा नंबर लागला नाही. उंच टाचेचे बूटहि तसेच राहिले. साऱ्या वस्तूस या घडीस जो स्पर्श व्हायचा त्याने त्या जणु चैतन्यमय व्हायच्या. पण आज त्या जिथल्या तिथे निपचित होऊन पडल्या होत्या. आरशाला देखील आश्चर्याचा धक्का बसला. मालकिणीने आरशात पाहिले पण स्वत:कडे पाहिले नाही. आणि पाहिले नाही म्हणून त्या आरशापुढे घुटमळल्या नाहीत. फक्त एक रिबीन उचलली आणि त्यानी पोनी-टेल बांधली. नसता रोज त्या आरशापुढे निदान पाऊण तास तरी उभ्या असत. आरसा त्याना खुणा करायचा. इशारे करायचा आणि त्यानुसार पिना, आकडे, पावडर, सेंट, लिपस्टिक यांची संगत रंगे. आलटून-पालटून देह निरखण्यात ती गुंगे. बाहेर पडता पडता मागे वळोनी पाही आणि हरखून जाई. हंसाच्या डौलीने धुंदे. आज मात्र तिने अगदी फिकट रंगाचा आणि हलक्या वजनाचा फ्रॉक घातला. पायात रबराच्या सपाता सरकावल्या. परन्तु बाहेर पडणार तोच परतली. इतर साऱ्या वस्तूनी मालकीण आस्थेनं आपल्याला स्पर्श करेल ही आशा सोडली होती. फक्त एक कार्ड तिची वाट पाहत होते. मिसेस् लोबोने ते उचलले. त्यावरून नजर फिरवली. आजच दवाखान्यात चेकिंगला जाण्याचा दिवस होता याची खात्री करून घेतली. कार्ड आपल्या पर्समधे टाकत ती स्वत:शीच पुटपुटली 'आज तरी डॉक्टर तारखेचा अंदाज देतील म्हणजे रजेचा अर्ज मंजूर करून घेता येईल. हालचाल, दगदग, गर्दी आणि गजबज अगदी नकोशी वाटते....' रस्त्याने मंदपणे चालताना तिला काही. . . कोण पाहत आहे, काय बोलत आहे— काही म्हणजे काही पाहण्याचं त्राण नव्हतं. इच्छा नव्हती, फक्त आठवत होती मानेवरून फिरलेली साहेबांची बोटे. त्या बोटांना शंभर तोंडे फुटली होती, आणि त्यांच्या असंख्य वाचा म्हणत होत्या 'जा, आता रजेवर तू. बेडब दिसतेस. थकलीस. काम करणे जमणार नाही. . . शोभणार नाही. . . शोभणार नाही. . . शोभणार नाही. . . शोभा. . .'

–सिनिक्













"पण तुमची त्याला फूस आहे."

"मी त्याला फक्त गाणे शिकवतो."

"पण त्याला गाणे शिकायचे नाही."

"त्यालाच विचारा ह्या प्रश्नाचे उत्तर."

"चल रे सुरेंद्र घरी."

तरीही सुरेंद्रानी तंबोरा खाली ठेवला नाही. ते गातच राहिले. वडील तावातावाने निघून गेले. त्या रात्री त्याना बेदम मार मिळाला. जेवण देण्यात आले नाही. त्यांच्या आईने मध्यरात्री त्याना थोडे खायला घातले. पण शरीर आणि मन ढुसढुसतच राहिले.

पहाटे चारच्या सुमारास त्याना जाग आली. त्यांच्या उशाशी तंबोरा छेडला जात होता. गाण्याचे सूर ऐकू येत होते. ते सूर जणु त्याना साद घालीत होते. त्याना काही तरी निर्णय घ्यायला सांगत होते. प्रत्येक वण सांगत होता की, "प्रत्येक रागाबरोबर असा प्रसाद तुला मिळेल. आहे कबूल ?"

तिरिमिरीतच सुरेंद्र उठले. त्यानी कपडे केले आणि दरवाजा उघडून ते चालू लागले. त्यांच्या वडिलानी त्याना अडवण्याचा प्रयत्न केला होता. "पुन्हा कधी घरात घेणार नाही." म्हणून दमही भरला होता. पण "मीच येणार नाही" म्हणून सुरेंद्रानी त्याना उत्तर दिले होते.

त्यानंतर सुरेंद्रानी संगीताची कसून साधना केली होती. बुवांची शागिर्दी करून, त्यांच्या घरात कुठेही काही कमी पडू नये याची काळजी वहात कला-साधना केली होती. आणि ती साधना पूर्ण करून ते त्यावेळी खूप गाजलेल्या अशा "नाट्य पराग" ह्या नाटक कंपनीत दाखल झाले होते. त्यांच्या नाटकातल्या प्रमुख संगीत-प्रधान भूमिका वठवीत होते. त्यांचा धैर्यधर, त्यांचा चारुदत्त, कृष्ण, आश्विनशेट, त्यांचा जयंत आणि सुधाकर लोकप्रिय झाला होता. त्यांच्या गाण्यावर लोकांच्या तुफानी उड्या पडत होत्या. अवघ्या पांच वर्षात त्यानी 'सुर-सम्राट' ही पदवी मिळविली होती. शंकराचार्यांच्या हस्ते त्यांचा सत्कार झाला होता. त्यांना 'नटश्रेष्ठ' ही किताबत देण्यात आली होती. साऱ्या भारतात त्यांच्या कंपनीचे नांव झाले होते. कंपनीला वैभव मिळाले होते. ह्या वैभवाचे अंशत: कां होईना आपण शिल्पकार आहोत या गोष्टीचा सुरेंद्राना अभिमान वाटत होता. आपल्या गांवी वा जवळपास कंपनी गेली की ते आवर्जून वडिलांना बोलावीत होते. गाडी पाठवीत होते. पण तितक्याच ठामपणे त्यांचे वडील नकार देत होते. गाडी परत पाठवीत होते. त्यानंतरच्या काळात कंपनीने खूप दौरे काढले. कंपनीला पैसा मिळाला. सुरेंद्रा-नाही मिळाला. पण त्या श्रमांचा त्यांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम झाला. गायकी आणि जाग्रणे, प्रवास आणि परिश्रम ह्यातूनच भलतेच दुखणे उद्‌भवले. ऐन वभवाच्या दिमाखात असताना सुरेंद्र आजारी पडले. त्यांना टाळ्या मिळत होत्या. हारतुरे मिळत होते. वृत्तपत्रीय प्रसिद्धि भरपूर मिळत होती. मालविकेसारखी एक अनन्यसाधारण सुंदर स्त्री त्यांच्या कलेवर मोहित झाली होती. त्यांच्या कलेला ती फुलवीत होती. आणि स्वत:ही फुलत होती. "मला तुमचे गाणे हवे. तुमची कला हवी." असे म्हणत होती. तीही मर्यादा पाळत होती आणि मर्यादा कशी पाळावी, प्रतिष्ठेने आपुलकी कशी व्यक्त करावी ह्याचा जणु वस्तुपाठच ती देत होती. पण हे सारे लाभूनही सुरेंद्रांच्या प्रकृतीने दगा दिला होता. त्याना गाणे आणि नाटक ह्या दोन्ही गोष्टी काही काळ विसराव्या लागल्या होत्या. हॉस्पिटलमध्ये त्यांच्यावर दोन कठिण अशा शस्त्रक्रिया कराव्या लागल्या होत्या. आठ दहा महिने त्यांना हॉस्पिटलमध्येच पडून रहावे लागले होते.

हॉस्पिटलमध्ये मालविकाही त्याना वारंवार येऊन भेटत होती. चौकशी करीत होती. म्हणत होती, "तुम्हाला पुन्हा एकदा रंगभूमी-वर उभं राहयलेलं कधी पाहीन असं मला झालंय् ! तुमच्या गाण्याची तहान मी रेकॉर्डसवर भागवते थोडीफार. पण तुमच्या गळ्यातले गोड गाणे त्या बंदिस्त पेटीत गुदमरून जाते आहे असेच वाटत राहते. वाटतं हा माणूस बरा व्हायलाच हवा. मराठी रंगभूमीला त्याची आत्यंतिक गरज आहे. त्यावर तिच्याकडे मिश्किलपणे पहात सुरेंद्र म्हणाले होते, "फक्त मराठी रंगभूमीलाच ना ?"

"मराठी नाटचरसिकानाही !"

"मग त्यांचं ते आणि आम्ही पाहून घेऊ."

"ते पाहण्यासाठीच तर मी आले आहे."

"प्रतिनिधी म्हणून ?"

"नाही. मीच आपण होऊन आले आहे."

"पण कां ?"

"मला तुमचं गाणं आवडतं. अभिनय आवडतो. कुठेतरी मी मोठी होते आहे याची एक आगळी जाणीव मला होत जाते म्हणून."

"बस्स ! येवढंच ?"

"सांगता येण्यासारखं येवढंच !"

"न सांगता येण्यासारखं काय मग ?"

"ते कसं सांगता येणार ? ते ओळखायचं असतं."

"कसं ?"








ह्यावर मालविका काही बोलली नव्हती. तिने आपल्या पिशवीतून मोसंबी काढल्या होत्या आणि त्यांच्या शेजारच्या कपाटात त्या ठेवताना ती म्हणाली होती "आत्ता घेणार का रस ?" ह्यावर ते म्हणाले होते "गोड असला तर घेऊ."

"घ्या म्हणजे समजेल." असं म्हणत तिने त्याना दोन मोसंबीचा रस काढून दिला होता. तो ग्लास तोंडाला लावल्याबरोबरच ते म्हणाले होते "वाऽ ! फारच गोड हं ! मोसंबी गोड. मोसंबीचा रस गोड आणि. . . " ते मुद्दामच थांबले होते. "आणि काय?" असं ही मालविका विचारणार यावद्दल त्याना खात्री होती. तिने विचार-लेच. "सांगायलाच पाहिजे काय ?" असं ते म्हणाले होते. यावर ती खूप लाजली होती.

त्यानंतर ती वारंवार दवाखान्यात आली होती. तिची भावना तिने कृतीने व्यक्त केली होती. एकदा अशीच ती आली होती तेव्हाचा प्रसंग सुरेंद्राना आठवला होता. आल्याबरोबर तिने त्यांच्या पलंगावर त्याच दिवशी खरीदलेली दोन नवी कोरी पुस्तके ठेवली. त्यावर मोगऱ्याचा गेंदेदार गजरा ठेवला आणि कपाटात मोसंबी ठेवीत मुद्दामच त्यांच्याकडे पहात ती म्हणाली होती "गोड आहेत हं !"

"खात्री पटली आहे. पण हे सारं तू कां करते आहेस ?"

"मला तरी कुठे याचं उत्तर ठाऊक आहे ? ते शोधून काढायला तूर्त वेळही नाही. आणि त्याची गरज तरी काय ? मला तुमचे गाणे आवडते. तुमचा अभिनय आवडतो. तुमच्या साऱ्या नाटकाना मी अगदी पहिल्या रांगेतले तिकीट काढून आलेली आहे. तुमची नाटके मी पुन्हा पुन्हा पाहिली आणि पुन्हा पुन्हा पाहते आणि तरीही माझे समाधान होत नाही. तुम्ही आजारी पडलात तरीही तुम्हाला पाहिले पाहिजे. तुमच्याशी बोलले पाहिजे. तुमच्या कलेचं काही तरी मी देणं लागते असंच मला वाटतं आणि माझी-पावले इकडे वळतात. बस्स इतकंच !"

"इतकंच ?"

"जाणीवेत तरी इतकंच !"

"आणि नेणीवेत ?"

"नेणीवतली गूढं कुणाला उकलली आहेत? मला यात समाधान मिळतं. आनंद मिळतो. हरवलेलं काहीतरी गवसतं. बस्स ! मी त्याची भुकेली आहे, सुरेंद्र ! तुम्ही पुन्हा रंगभूमीवर उभे राहिला पाहिजे. तुमच्या सुरेल आणि मधाळ गाण्याने तुम्ही प्रेक्षागाराला मंत्रमुग्ध केलं पाहिजे. वन्स-मोअरचा पाऊस पडला पाहिजे. त्या दिवशी हर्षाचे रोमांच फुलतील माझ्या अंगावर. मनातला मोगरा आनंदाने गाऊ लागेल तृप्तीचे गाणे आणि भोवती घुमू लागेल सृष्टीचा कथ्थक ! सुरेंद्र, मी त्या दिवसाची स्वप्ने रंगवीत इथवर येते आणि तुम्ही दिसलात कीं, ती स्वप्ने साकार होणारच होणार हा विश्वास मला मिळतो. बरे व्हा सुरेंद्र. लवकर बरे व्हा. मी त्या दिवसाची वाट पहाते आहे." असं म्हणत तिने त्याना थोपटल्यासारखे केले. त्या पहिल्या स्पर्शात सुरेंद्राना जाणवले ते त्यातील वात्सल्य–जिव्हाळा. एका तरुण रूपवती, गुणवती, रसिक स्त्रीचा तो स्पर्श होता आणि तो उत्तेजक होता पण उन्मादक नव्हता. त्याची जादू सांत्वनाची होती. त्यावर सुरेंद्र म्हणाले होते "आता मी लवकर बरा होईन. खडखडीत बरा होईन. मला पुन्हा उभं रहायला हवं. रंग फासायला हवा. गायला हवं. दाद घ्यायला हवी. वन्स-मोअर घ्यायला हवेत. मी ते घेईन मालविके. ते घेतल्याशिवाय मी जाणार नाही. रंगभूमी हे तर माझे श्वसन आहे. संगीत हा तर माझा आत्मा आहे. मला खूप धीर आलाय्. पण तू मात्र त्या दिवशी आलं पाहिजेस."

"हे काय सांगणं ? मी येईन. माझ्या नेहमीच्या जागी बसेन. पहिली दाद माझी असेल."

हे तिचे आश्वासन तिने पाळले होते. सुरेंद्राना तिनेच नाटय-गृहापाशी आणून सोडले होते. "तुमच्या आजच्या पुनरागमनाला मी सुयश चिंतिते आणि तुम्हालाही" असं ती म्हणाली होती. आणि "मी जरा घरी जाऊन येते." असं म्हणत ती परत गेली होती.










दुसरी बेल झाली. आणि सुरेंद्र एकदम भानावर आले. त्यानी हातातली सिगरेट फेकून दिली. आणि कपडे अंगावर चढवायला सुरुवात केली. धैर्यधराचा पोषाख ते आज जवळजवळ वर्षाने अंगावर चढवीत होते. तो चढवीत असताना कंपनीतले त्यांचे चहाते येत होते. "छान ! सुंदर. धैर्यधर पुन्हा शोभून दिसतो बुवा !" वगैरे सारखे अभिप्राय देऊन जात होते. हास्य विनोद चालू होते. जुन्या वैभवशाली आठवणी निघत होत्या. त्यातली प्रत्येक आठवण धैर्यधरालाच नवा वीर देऊन जात होती. आणि बजावीत होती, "त्या अनुभवांपेक्षा खालचे असे काहीही नको. वरचे हवे. नवे हवे. तुमची कला तेवढा चमत्कार करू शकते सुरेंद्र." सुरेंद्राची वेषभूषा संपली. त्यांनी आरशात पाहिले. कपडे सारखे केले. पावडरचा पफ हळुवार हाताने तोंडावरून फिरविला. नटराजाला त्यानी नमस्कार केला आणि ते मागे वळले तेवढ्यात मालविकेकडे त्यांचे लक्ष गेले. ती तेथे केव्हा येऊन उभी राहिली ते त्याना कळलेच नाही पण रंगभूमीवर पाऊल टाकण्यापूर्वी ती भेटावी असे मात्र त्याना फार फार वाटत होते. ती भेटली. ते हसले. तिने काही तरी बोलावे असे त्यांना वाटत होते. पण ती गप्प होती. त्यांच्याकडे एकटक पहात होती. त्यानी तिला विचारले कां, बोलत कां नाहीस ?"

"हे तुमचं रूप मी डोळ्यात भरून घेते आहे. तुम्ही दवाखान्यात होतात ना तेव्हा मी नुसत्या कल्पनेनेच ही तुमची रूपे डोळ्यांपुढे आणत होते. आज वर्षाने ते रूप मी प्रत्यक्ष पाहते आहे. माझीच कदाचित त्याला दृष्ट लागायची. नाटक संपल्यावर थांबा. मी तुमची दृष्ट काढणार आहे."

"मला कुणाची दृष्ट लागणार आहे ? त्यातल्या त्यात तुझी तर नाहीच नाही."

मालविकेने "न लागो दृष्ट राजसा" असे अगदी हलक्या आवाजात म्हटले. सुरेंद्र हसले. ती म्हणाली "आता मी जाते. आज वर्षाने तुम्ही रंगमंचावर येणार आहात. मी तुमचं अभिनंदन करते." आणि ती निघून गेली.

तिसरी घंटा झाली. मुहूर्ताचा नारळ फुटला. सुरेंद्रानी रंगदेवतेला, रंगमंचाला व नटराजाला पुन्हा एकदा अभिवादन केले. आपल्या आई वडिलांना पुन्हा एकदा आत बोलावले. त्याना नमस्कार केला व म्हणाले "आज माझ्या जीवनातला परम भाग्याचा दिवस. तुम्ही यावं. माझी कला पहावी. पाठ थोपटावी असं मला फार वाटायचं. पण तो योग नव्हता. आज तुमचे मायेचे हात माझ्या पाठवरून फिरतील. मी धन्य होईन."

त्या दोघानी त्यांच्या पाठीवरून हात फिरविले.

नाटकाची नांदी झाली. पडदा वर गेला. आणि नाटकाला सुरुवात झाली. धैर्यधराच्या पोषाखात सुरेंद्रानी रंगभूमीवरच प्रवेश केला आणि नाट्यगृहात टाळ्यांचा जणु पाऊसच पडला. "वक अप सुरेंद्र" 'धीरीयो' असे सामुदायिक उद्गारही ऐकू येऊ लागले. रंगभूमीवर प्रवेश करताच त्यांची नजर मालविकेच्या खुर्चीकडे गेली. त्या असंख्य टाळ्यात तिचीही टाळी होती. नंतर त्यानी वडिलांकडे व आईकडे पाहिले. त्यांच्या डोळ्यात अश्रु होते– आनंदाचे, अभिमानाचे आणि कदाचित पश्चात्तापाचेही– निदान सुरेंद्रांना तरी तसे वाटले. "माता दिसली समरी विहरत" "चंद्रिका ही जणुं, झाले युवतिमना, दे हाता या शरणागता ह्या साऱ्या गाण्यानी वन्समोअर घेतले. नाटक रंगत होते. गाणी बेमालूम होत होती. टाळ्यावर टाळ्या गरजत होत्या. साऱ्या प्रेक्षकानी जणु ते नाट्यगृह, ते नाटक आणि सुरेंद्र याना डोक्यावर नाचविण्याचाच निर्धार केला होता. पहिला अंक झाल्यावर ग्रीनरूमकडे माणसांची रीघ लागली. आवरणे कठिण गेले. साऱ्यानी "त्याना एकदा दारात येऊ द्या" म्हणून आग्रह धरला. तो मोडवेना म्हणून सुरेंद्र दारात आले. त्यातल्या दहा पांच लोकानी त्याना नोटांचे हार घातले. काहीनी त्यांचे पाय धरले. काहीनी हात उंचावून व "सुरेंद्रांचा जयजयकार असो" म्हणून घोषणा केल्या. ह्या प्रेमाने अक्षरशः सुरेंद्र भारावून गेले. हे सारे अभूतपूर्व होते. आनंदमय होते. धन्यता वाढावी असेच होते. मालविका सर्वात शेवटी आत आली आणि एकच शब्द ऐकवून परत गेली, "सांभाळा ?" त्या शब्दात तिचे सारे भाव जणु प्रगट झाले होते.

"नाटक अप्रतिम चालले आहे" ही भावना प्रेक्षागाराच्या भिंतीचा कणन् कण जणु सुरेंद्राना सांगत होता. सुरेंद्रांच्या अंगातल्या कणाकणावर कलेची धुंदी चढत गेली. ते जणु सुरेंद्र राहिलेच नाही. ते जणु आजारी पडले नव्हतेच. वर्षभरानंतर ते प्रथमच जणु काम

**क्रांति : वाहतूक नियंत्रणातली**



करीत नव्हतेच. त्यांचे ऑपरेशन, त्यांची विश्रांति. सारे काही ते विसरुन गेले आणि फक्त नाटक जगू लागले. गात राहिले–बोलत राहिले. वन्स मोअर मागून वन्सअमोर घेतच राहिले. वन्समोअर म्हणून पांच दहा आवाज आले तरी पुन्हा पुन्हा गात राहिले. टाळयांची ताटे फस्त करीत राहिले. वन्समोअरचे मद्य रिचवीत राहिले. वडिलांच्या नेत्रातली तृप्ति पीत राहिले. मालविकेची शाबासकी त्याना गुंगवीतच राहिली आणि "प्रेम सेवाशरण" हे गाणे म्हणताना त्यानी डोक्या-वरची पगडी काढली आणि ती भामिनीच्या पायावर ठेवण्यासाठी ते वाकले. त्यानी ती पगडी खाली ठेवली आणि ते उठणार तोच त्यांचा झोक गेला. भामिनीची भूमिका करणाऱ्या रूपमालेने त्याना सावरण्याचा प्रयत्न केला तरी ते खाली कोसळलेच. रंगपटातली सारी पात्रे पुढे धावली. प्रेक्षकात बसलेले डॉक्टर मेघःश्याम पुढे गेले आणि त्यानी सऱ्याना बाजूला व्हायला सांगितले. स्टेथॉस्कोप काढला. वारा घालायला सांगितले. नाडी हाती घेतली. एक सेकंद–दोन सेकंद — दहा सेकंद. काळ अक्षरशः पळत होता. पण ते प्रेक्षागार मात्र शांत होते. टाचणी पडली असता तरी तिचा आवाज साऱ्याना ऐकू आला असता. साऱ्यांचे श्वास रोघले गेले होते. डॉक्टर मेघःश्याम यांच्या चेहऱ्यावरचे भाव सारेजण न्याहाळीत होते. हातातली सुरेंद्रांची नाडी सोडून ते शांत मनाने जेव्हा विंग-मध्ये निघून गेले तेव्हा साऱ्यांच्या तोंडचे पाणीच पळाले. साऱ्यानी रंगदेवतेचा आणि सुरेंद्रांचा जयजयकार केला. सारे सभागार जयकारांनी दुमदुमले. सुरेंद्रांचे आईवडील त्यांच्या जवळ जाऊन बसले. श्रोत्यानी, प्रेक्षकानी, सहकारी नटानी सुरेंद्रांच्या पायाना वंदन केले आणि ते आत निघून गेले. कित्येकांनी आपल्याजवळचे होते नव्हते तेवढे पैसे सुरेंद्रांच्या चरणी वाहिले. प्रेक्षागार रिकामे झाले. सहकारी नट रंग कापडे उतरून बाहेर आले. त्यांना ते ओकेबोके प्रेक्षागार पाहून भडभडून आलं आणि "काय झालं हो हे सुरेंद्र" म्हणून ती माणसे शोक करू लागली. सुरेंद्रांची आई धाय मोकलून रडली. पण बापाचा शोकाने चेहरा गोठला होता. त्याला जणु हसता रडताच येत नव्हते. त्यानी निर्विकार मनाने समोर नजर टाकली. त्याना समोरच्या रांगेत कुणीतरी बसलेले दिसले. त्यानी मॅनेजरला सांगितले. मॅनेजर बाहेर गेले. पहिल्या रांगेतल्या त्या खुर्चीत माल-विका बसली होती. ती हलत नव्हती. बोलत नव्हती. रडत नव्हती.

तिचा 'पंछी' केव्हाच उडून गेला होता. •••










# मवाली

—सौ. सुनीता देवधर

**"मवाली" नको तिथे शब्द उमटले आणि तिने जीभ चावली. कोमल भावना थरथरली आणि दोघात नेत्रपल्लवी झाली....**

**ती** घाईने दुकानात शिरली. एकाला तिचा धक्का लागला आणि तिला जाणवलं. वळून न पहाताच जाणवलं. तो नजरेने तिला पीत होता. धक्क्याचा धसका दोघा-नाही बसला होता. आणि जाणीवेपोटी.

"Sorry."

"सॉरी."

शब्द उमटले. उगाचंच.

दोघांना बरं वाटलं.

आणि मग ती नजर सारखी तिचा पाठलाग करीत राहिली.

तो बसस्टॉपवर उभा होता.

"या" तिला पाहून तो सहज म्हणाला.

"मवाली" नको तिथे शब्द उमटले. आणि तिने जीभ चावली. कोमल भावना थरथरली. आणि दोघात नेत्रपल्लवी झाली.

"सॉरी चुकलं माझं."

"कसं ?"

"मी असं म्हणायला नको होतं."

"मीच ते म्हणायला हवं होतं. त्यादिवशी दुकानात."

"अय्या ! हे हो काय ?"

"चुकलं तुमचं नाही माझंच."

"असं कसं ? सॉरी म्हणते ना."

"आता त्याचा उपयोग नाही."

"कां हो ?"

"कारण मी मवाली आहेच."

"म्हणजे ?"

"कळेल पुढे."

फिरून तोच. बसस्टॉपवर. तो चढला. तिला कंडक्टरने अडवलं. पण त्याने हात देऊन तिला आत घेतलं.

असू दे. दोघं बरोबर आहेत. कंडक्टरचं स्त्रीदाक्षिण्य जागलं आणि तिला सीट मिळाली. दुसरीकडे.

ती सावरून बसली. तो पहात होता.

तेथला माणूस मग दोन स्टॉपनंतर उठून गेला. तिच्याजवळची सीट रिकामी झाली. आणि तो उठून तिच्याजवळ जाऊन बसला. निर्लज्जपणाने.

तिही मग सहजच मोकळी बसली. तिने दोन तिकिटं घेतली. सीट मिळवून दिल्या-बद्दल आभारादाखल काहीतरी हवंच. पायाला पाय. खांद्याला खांदा. स्पर्शसुखाची गोड शिरशिरी. आणि नजरेची मादक थरथर.

सगळे पहात होते. पण दोघातली ती जाणीव हरवली होती. दोघांमध्ये ती बुडून गेली होती. मग उत्तेजन देण्याएवढी तीही धिटावली आणि शब्दांना रंग चढला





अनुक्रमणिका

गुलाबी–निळा.

रोजची गाडी सुटली आणि धावत पळत ती समोरच्या डब्यात चढली. हललेल्या गाडीत त्याने तिला सावरलं. आत घेतलं आणि मग गर्दीत त्याला खेटून ती तशीच उभी राहिली नाइलाजाने.

जिथं तिथं उपटतो. छळवाद मांडलाय नुसता. शब्द मनात कुरकुरले. पण हृदयाची साद मिळाली नाही. नजरेने धोका दिला. आणि मग मनाने पलट खाल्ली. मवाली की देवदूत ? कुणास ठाऊक ? बसमध्ये जागा मिळवून देणारा, हलत्या गाडीत सांभाळणारा. मवाली की देवदूत ? मनात तरी काय आहे कुणास ठाऊक ? त्याच्या? माझ्या ? आणि देवाच्या ?

तिचा चेहरा तो वाचत होता. मिष्कील नजरेने लाजरे भाव टिपत होता. गोड हसरी नजर त्याला साद देत होती. आणि पुन्हा पुन्हा पाठलाग चालूच होता.

आणि मग तिची नजर धिटावली. कोमल भावना धुंदीत थरथरली. कधीतरी निसटून गेलेल्या 'मवाली' घायाळ शब्दाने ती व्यथावली तरी जीवघेण्या त्याच्या रोखल्या नज़रेने ती शहारली, फुलारली आणि तिच्या मनातील संवेदना खूप सुखावली. मनीमानसी ती त्याच्याचसाठी ध्यासावली. अधीरतेने ताणावली. आणि रात्रंदिन तिच्या नजरेसमोर...

एक टेरेलीन सूट. रुबाबदार धुंद रोखती नजर, लख्ख गोरेपण, आकर्षक हालचाल. ऐट, डौल, रुबाब सगळंच मस्त. मनाला आणि शरीराला चटका लावणारं. हवसं वाटणारं.

स्त्रियांना हवंस वाटणारं खूपसं काही त्याच्याकडे होतं. वेडं बनवणारं आणि त्या वेडातच रूतून बसणारं. मादक, आकर्षण आणि आणि. . . .

एवढंच नाही. याचा संबंध केवळ शरीराशी पण ती चोरटी हुरहूर. ती गहिरी जाणीव. समोर नसताना कुठेही कधीही नजरेसमोर ठाकणारं ते दिमाखदार पौरुष आणि. . . . यालाच म्हणतात . . . कुणास ठाऊक ?

ही नवी भावना लाडीक होती. धीटाई साकळून टाकणारी. शब्दाना साकडं घालणारी आणि तडफेला लाजरीबुजरी बनवणारी. हे केवळ आकर्षण नाही. नक्कीच नाही. यालाच म्हणतात .... कुणास ठाऊक ?

खूपसं कळूनही तिला काहीच वळलं नाही. ती केवळ त्याच्यासाठी ध्यासावली. तिच्या मनाची खिडकी उघडली आणि त्यांतून प्रीतीची लाजरी भावना डोकावली. प्रीतीच्या पूर्तीसाठी ती अधीरली. आणि स्वप्नील धुंद कल्पनेत विसावली, सुखावली.

पण तो आता तिला कुठंच दिसला नाही. भेटला नाही. खूप खूप दिवसात भेटला नाही. तिची न्याहाळती बावरी नजर त्याच्यासाठी थबकली. लाजरीची मिटती पानं पावसासाठी आसावली. मोगरीची कोमेजती कळी ओलावण्यासाठी हपापली पण तो आला नाही. दिसला नाही. क्षणक्षण युगासारखा. प्रतिक्षेची वीणा झंकारत राहिली आणि त्या वीणेतून भैरवी निनादणार या जाणीवेने ती व्यथावली. मनाच्या उबगतेची निळाई प्रीतीच्या मद्यात मिसळली आणि त्यातील तरंगांची धुंदी विषमय झाली.

नांव नाही गाव नाही, पत्ता मुळी ठाव नाही. त्याच्यासाठी कशाला ताणायची मनाची सतार ? जाऊ दे. कोण कुठचा. कशाला त्याच्यापायी हा जीवघेणा ध्यास, स्वप्नील आस. पण समाधान अतृप्त आर्ततेत बुडालं आहे. फिरून सगळं कळत आहे पण वळत नाही. शरीराला पटत नाही. मनाला समजत नाही. नजरेला उमजत नाही. शरीर, मन, नजर आणि हृदयसुद्धा ?

सगळ्याना तोच हवा आहे. फक्त तोच !

आणि मग तिच्या मनात एक ताल उमटला. उगाच चाळा. त्या निमुळत्या शब्दाना तिचं दुखरं मन धार देत राहीलं. पण त्या धारेने तीच रक्ताळली. मनाची असह्य थयथय अधीकली. आणि ते दुखरे क्षण दूर जावे ह्यासाठी ती आणखी ध्यासावली.

प्रीतीचं हे नितांत देखणं रूप तिला सर्वस्वी अनोखं होतं. ते तिला फार मोहक वाटलं. त्या मोहकतेत पोहत ती आपलं प्रीतिफळ धुंडाळत राहिली. सारखी भिरभिरत राहिली.

वाट पाहून तिची नजर शिणली. वेडी आशा, जीवघेणी हुरहूर आणि नजरेची फिरभिर मनात थबकली. मनाच्या कोपऱ्यात भोळे भाव दबून बसले. गालावरची खळी कुसकरण्यासाठी अधीरली. नजरेतील थबकती गोड भावना शिण शिण शिणली. ती फुलवायला तो येईल का ? माझा राजा येई का ? एक आर्त हाक आणि प्रीतीची आणभाक केवळ नजर आणि मन यानी दिलेली शब्दविरहीत भाक.









एक लोभस भावनेचं आर्त दर्शन.

दोन गाड्या समोरासमोर आल्या. उभ्या राहील्या आणि तिने पाहीलं. खिडकीतून रुमाल फडफडला. पहिल्या वर्गाच्या डब्यातून तेच लाघट हसणं आणि रोखती नजर. एक मादक शिरशिरी सर्वांगातून लहरली. आणि अभावितपणे रुमाल उचलला. फडकला आणि प्रीतीची साक्ष फिरून उजळली. ते दर्शन सारा दिवस तिच्या नजरेत थवकलं. मनी भारावलं आणि ती फार फार सुखावली.

पण तो फिरून अदृश्यच राहीला. भेटला नाही, दिसलाही नाही. तिची हुरहूर फिरून शिणवटली. प्रीतीची लाजरी भावना फिरून व्यथावली. आणि मनात एक चुळबुळ भारावली.

आणि मग अचानक तिची वदली झाली. तिला वढती मिळाली आणि तिची बदली झाली. नवीन ऑफीसचा पहिला दिवस. तिने मस्टरवर सही केली. आणि जागेवर बसली. साहेब बोलावतात. शिपाई निरोप घेऊन आला. केबिनचं दार उघडलं गेलं आणि ती आत शिरली. नजरेत नजर मिसळली. मादक शिरशिरी आतवर उठली आणि शरीरं फुलारली. मनं सुखावली. डोळे हसत राहीले.

"तू ?" सहज एकेरी शब्द उमटला.

"अय्या तुम्ही ?"

ऑफीसच्या इंटरव्ह्यूची अशी सुरुवात झाली. नको त्या शब्दाचं उच्चारणं, पाठीमागून मनाचं व्यथावणं आणि तो बॉस असल्याची जाणीव हे सगळं जाणून तिच्या मनात एक भीतीची छटा दडपली. पण तो हसतच होता.

"बसा ना" आठवण होऊन तो म्हणाला. नजर अजून रोखलेलीच होती.

तिची मान खाली गेली. तो काहीसं मोकळं, काहीस लाघट बोलत राहीला. मग तीही धिटावली. नजर उचलून तिने त्याच्याकडे पाहीलं. लाजरीची पानं उघडली. नांवागांवाची विचारणा झाली.

आणि मग एक दिवस बीट प्रश्न उमटला.

"घरी कोणकोण आहे मिसेस. . . "

"अऽहं माझं लग्न झालेलं नाही" तो सत हसत म्हणाला.

"अय्या" उगाचंच नवल.

"दादरला ब्लॉक घेतला- नाहीतर--"

"नाहीतर काय ?"

"मालाडला असतो तर कधीच लग्न झालं असतं."

"म्हणजे ?" नजरेत हसरे मिष्कील भाव उमटले.

"म्हणजे एक मुलगी आवडली आणि ती मध्येच हरवली."

"अस्सं ? आता ?"

"शोधून शोधून दमलो."

"मग दुसरी बघायची."

"अस्सं ?" तीच खोडकर नजर, तेच खटयाळ स्मित.

"इश्श" विनप्रश्नाला एक अर्थपूर्ण उत्तर.

"पण आता सापडली."

"पुन्हा इश्श" आणि हाताचा स्पर्श.

हेच रोजचं झालं. दर्शनसुख आणि कागद देता-घेताना सहजस्पर्श. इतकीच मर्यादा आणि त्यामुळे वाढणारी जीवघेणी तळमळ.

"या मवाल्याची छोटीशी विनंती आहे." साळसूद प्रश्न.

"इश्श" एक अर्थपूर्ण उत्तर. आणि नजरेत भीति, लज्जा, अनुराग अशा खुपशा छटांचा मनोज्ञ संगम.

तो बोलायचं विसरला. नुसता पहात राहीला.

"काय ?" त्याने तिला जवळ ओढली.

"मवाली शब्द अजून विसरलो नाही?" तिने काकुळतीने विचारलं.

"विसरेन कसा ? मी मवालीच आहे?"

"म्हणजे ?"

"सांग ?"

"हो !"

"नक्की ?"

"माझं नांव म. वा. लि. मनोहर वामन लिवाते."

"अय्या" एक आर्त हांक जशी प्रीतीची साद.

त्याने तिला जवळ ओढली.

"कबूल ?"

"येस् सर" घाईघाईने दूर होत ती म्हणाली.

शिपाई आत शिरत होता.

आणि मग लवकरच दोघांनी रजा घेतली. निमंत्रणं वाटली. पार्टी दिली. सगळं जॉइंटली.

लवकरच हनीमूनसाठी काश्मीरची सहल निघणार आहे. एक मवाली आणि एक सळसूद इश्श-दोघांची.

●●●

## 'किंचित' षट्क

### शब्द भारत

अर्जुनाची 'ती' बहन्नडा
शिखंडीचा 'तो' झालाना
'वचना'ची अनुस्वाराने
कुंकु लावुनी केली 'वंचना'

### लावणी

कलमदान सरसावुनी
'लावण्या'च्या रुप वर्णनी
पेरित मोती मोत्या मानुनी
पूर्ण केली शब्द 'लावणी'

### सती

वट-वृक्षाचे खोड सारे
कोळिष्टकानी वेढलेले
कोळिण म्हणे बरे झाले
सावित्रीचे वृत घडले

### बावन्-कशी

रसरशीत तप्त अंगकांती
लावी चटका, वेड लावशी-
स्पर्शिताच गे सोन पुतळी
आहेस अशी बावन्-कशी

### अगदीच द्वाड

बरेच दिवसानी
पाहिले जेव्हा तुला
अगदी द्वाड मेला
लवला डावा डोळा

### मतभेद

नवकवि- (धूळ टिचकवुनी शंभरदा)
खरे- नवकाव्य- नवकाव्य
वाचक- (पंचमाची फक्की मारुनी)
हं हं नव्हं काव्य, नव्हं काव्य.

—मधुसूदन वागडे



अनुक्रमणिका



" आरं रंगा, आज तुला तुहची वैनी दावतुं."
"आँ! आज.न राती? त्ये बी लगिन लागा पूर्वीच ?—
ही कायरं भानगड सखा ?"
" आज पिराची जत्रा हाये ना. वैनीबी दावतो
न जत्राबी, मंग तर खुष ?"

—द. स. काकडे

# डागळलेली कैरी



**अदमासपंची** रातच्या आठा-नवाचा सुमार असेल. सखा मांडवात त्यावेळी वैलांपुढच्या गव्हाणीतील वैरणीचं चगाळ बाहेर काढून ती साफसूफ करत होता. गव्हाण साफसूफ झाल्यावर तो तिच्यात तोडून ठेवलेल्या कडब्याचं भेळं फोडू लागला. तोच भुसाच्या तुटक्या डाल्यात अंगाचं मुटकुळं करून बसलेलं लुद्भरू बांडं कुताल्डू तटकन् उठलं. पडाळीच्या आंगून मांडवाकडं येणाऱ्या माणसाची चाहुल सखाला देऊ लागलं. मांडवाकडं ह्या टायमाला कोण येतंय्, हे पहाण्यासाठी म्हून सखानं मानकाट वर केलं. चांदणं चांगलं पडलं होतं. त्यामुळं मांडवाकडं येणारं माणूस कोण आहे, हे सखानं तात्काळ ओळखलं.

आपला बदगीचा पहिलवानकी करणारा मावसभाऊ रंगा हा मोठ्या रुबाबात ढेंगा टाकित येतोयसा पाहून सखा पुढं धावला. तो बांडं कुताल्डू त्याच्या पायात घोटाळलं. तसा सखा खाली आपटला. तरी धडपडून उजून उठला. लगालगा पुढं झाला. रंगाच्या पिळदार शरीराला कडकडून मिठी मारत अत्यानंदानं बोलला,

'रंगा, कंदी आलास रं बदगीवून?'

'ह्यो पग आत्तांच. पडाळीत खुटीला काच्या लंगटाची पिशी अडकावली. त तूं हिकं हैस, हा पत्त्या मावशीनं दिला. म्हून तिथं वूड न टेकावता तसा हिकं आलु पग...'

'मंग काय म्हणतीय तुही तालमीची तयारी?' सखानं रंगाचं पिळदार दंड दावीत म्हटलं.

'माह्या तयारीचं मरूं दे रे. पर तुह्या लग्नाच्या तयारीचं काय ?" रंगानं सखालाच उलट सवाल केला.

अनुक्रमणिका

सखाला रंगानं लग्नाच्या तयारीचा सवाल करावा, तशीच ती गोष्ट होती. कारण सखाचं लगीन आनंदवडगावच्या पोरीबरोवर जमलं होतं. इतकंच काय पण त्याच्या नवरीचं कुंकू सुद्धा लागलं होतं. पुढल्याच आठवड्यात त्याला टिळा लागून त्याचं लग्न होणार होतं. त्यासाठीच रंगा असा एरवाळी आला होता.

सखानं मांडवाच्या ताटीवरची सतरंजी खसखस खाली ओढली. अन् तिच्यावरच्या भुसाच्या वणग्या झटकल्यावर खाली भुयला अंथरली. मग दोघे सतरंजीवर आरामशीर वसले. तंबाखूचा इडा तळातावर मळू लागले. बोलायला अर्थात लग्न हा विषय परवळ होता. रंगानं आपली पैलवानकी थोडा वेळ बाजूला ठेवली. हंसत बोलला,

'सखा, तू तुही नवरी सोता पगितल्याव तुहं लगीन जमलं म्हणं?'

–सखा ह्यावर काहीसा लाजला. जरासा फुलला. मात्र शब्दानं बोलला नाही. त्याला थोपटत रंगा बोलला,

"पर काय रे सखा, नवरी रंवा, म्यानका, का आपली सकाय वडारीन ?'

'मला पुसण्यापरीस त्वा पगितलीस न्हाईस?'

'कुटली? तिच्या कुक्काला जाऊन तिला पगणार, त त्या दिशी माही अवसरीच्या हगाम्यात बबन आंबीकरासंगं कुस्ती ठरलीली. त्या दिशी मला कुस्तीचं जादा म्हत्‍म कनाई?'

'व्हय; त्यबी खरं. त्या दिशी काकानंबी ह्यच सांगितलं तुह्याइखी..'

'मंग झालं त. बोल; आत्ता माही वह्यनी कंदी दावतु मला?'

'माहं लगीन झाल्याव'.

'हात् त्येच्या सका. तव्हा त हिकाल्लं श्यामडं प्वारगं सुदिक तिला पगिल.'

'म्हई तुला माही नवरी लगनाआंदी पगायचीस तर?'

'व्हय. बोल कंदी दावतु ?'

सखानं टाळकं खांजाळलं. अन् मग चट्चिरी बोलला,

'आरं रंगा, आज तुला तुही वह्यनी दावतु.'

'अ्...आं ? आज? आन राच्ची? च्यायला ही काय भानगड सखा ?'

'रंगा, आज हाय पिंपरी पेंढारच्या पिराची जत्रा. त्या जत्रेला जातानं मधीच आपल्या सासरवाडीचं गांव लागतं. त काय, आपल्याला आज रात्री नवरीबी पगाया मिळणार, आन् पिराची भन्नाट जत्रा बी...?'

'बरं झालं. मला बी कोहाडंच पडलं व्हतं. तुही बाईल लगना आंधी पगाया मिळती कन्हाय?'

बैलांपुढच्या गव्हाणीत आणखी पाचूंदाभर कडबा गुडघ्यावर मोडून घातल्यावर सखा रंगाला घेऊन पडाळीकडं निघाला. बांडं कुताल्डू बी त्यांच्या मागोमाग लोंडा घोळीत येऊ लागलं. पण सखा त्याच्यावर डाफरला. तसं ते बिचारं बुजून तुटक्या डाल्यात जाऊन आरामशीर बसलं.

पडाळीत सखाची आई रंगा फार दिवसानी आला म्हून त्याच्यासाठी अंड्याच्या पोळ्या काढीत होती. आत पडाळीत टेकून वसल्यावर रंगा हसून वोलला,

मावश्ये, लय अंड्याच्या पोळ्या काढू नकुस ब्वाऽ...'

'कां जेवून बिवून आलाईस कुटून?'

'न्हाय ब्वा. पर जेवाय जान्हारंय्?'

'कुन्हीकं?'

रंगानं सखाला कोपरखळी मारली. अन् खुणावलं. 'सांग आपला बेत.' पण तो गपगुमान राहिला. रंगाच मग हसत बोलला,

'आज पिंपरीच्या पिराची जोर्दार जत्रा हाय ना?'

'हुं...म्हई त्या जत्रेला जाताना सासरवाडीला वाट वाकडी करणार तर...'

'न्हय.'

'पर तूं यकटाच कां?'

'न्हाय. सखा बी येतोय संगतीला. मला त पिंपरी बी म्हाईत न्हाय. आन् सासरवाडीचं गांव बी.'

'बरं त, जावा दोगं बी. पर व्ह, याक काम करा फिराडूं व्हतानी.'

'कणचं?'

'पराच्या दिशी नवरीची आय आळच्याच्या बाजरात भेटली व्हती. सांगून गेलीय, लोंच्यासाटी कैरी घिवून जावा म्हून. तव्हा तुमी द्‌वाघं हिकडं फिराडूं व्हतानी कैऱ्या आणा लोंच्यासाटी, काय?'

'व्हय मावश्ये; बरं झालं.'

'काय त्य ?'

'नवरीकं जायला त्वां चांगलं पबंळ कारान घिलं पग.'

'व्हय.' सखाची आई हसली. आणखी पुढं बोलली,

'पर रंगा, कैऱ्या मातर समद्या चांगल्या निवडून आणायच्या बरं. त्यातमंदी मला हिकडं यक्कबी डागलीली कैरी सापडाया नकु...'

'व्हय बी मावश्ये, ह्य काम माहं. ह्यो खुळा जरी यखांदी डागलीली कैरी घ्यवूं लागला, त मी त्येला घ्यवूं दिनार न्हाय. मंग त बास ना?'

'व्हय रं सोन्या, तू हैस तसा...' मावशी कौतुकानं बोलली.

थोड्याश्या अंड्याच्या पोळ्या चापल्यावर सखा रंगा पडाळीबाहेर पडले. आणे-माळशेज रोडनं पिंपरी पेंढारच्या रस्त्याला लागले. ते दोघे जत्रेला निघाले होते. पण खरं आकर्षण होतं नवरीचं. आणे-माळशेज रोड चांगला असल्यामुळे त्यांच्या गप्पानाहि उत' आला होता. मधूनच एखादी एस्टी धुरळा उडवीत ओतुरला जाई. तेव्हा मात्र त्यांची तोंडं झाकली जात.










सखाच्या सासुरवाडीचं गांव आनंदवडगांव जवळ आल्यावर सखा आपला पटका चालता चालता नीट बांधू लागला. मिश्यांवरून हात फिरवू लागला. रंगानं हे पाहिलं, तसा तो हसत बोलला,

'आरं सखा, आता तुमी दोगं एकमेकांन्ला पसंद पडून गेल्यात. आता तू ही टापटीप कश्यापाय करतूस? हां, यक मातर खरं, तिच्याव लगीन व्हयाच्या आंधी तुहं इंप्रिशन पडलं पायजे.'

—ह्यावर सखा नुसता हसला.

सखा रंगा सासुरवाडीच्या पडाळीत शिरले तेव्हा सखाची सासू जेवणाचं खरखाटं भांडं धूत होती. जावई आणि आणखी एक पाव्हणा आलेला पाहताच ती बिचारी हात साफ करून गडबडीनं उठली. अंथरायला काहीतरी टाकून अदबीनं बोलली,

'..जावाय आन् पाव्हणं बसा जी'.

सखा रंगा मांडीला मांडी देऊन बसले.

घुतलेलं भांडं फळीला लावल्यावर सखाची सासू जवळ आली. रंगाकडं कपाळावर आठ्या आणून पाहू लागली. पण तिला तो ओळखेना. सखाच मग बोलला.

'मामी, ह्यो माह्या बदगीवाल्या शिवूमावशीचा थोरला ल्योक रंगा. मोठमोठाल्या कुस्त्या मारत अस्तो पग चव्हकं...'

'ह्येचं लगिनबिगिन?"

'मामी, मंग म्या कुस्त्या नसत्या मारल्या ह्या. सरळ...' रंगा मिस्किलपणं बोलला.



त्यावर त्यांची ती सासू बोळकं वासून खळाळून हसली. त्याचा रंगानं फायदा घेतला. पडाळभर पहात तो बोलला,

"मामी, आमची नवरी पडाळीत दिसत न्हाय व?'

'च्.. च्.. चं. आवं, ती दोन दिस झालं तव्हा तिच्या मामानं तिला खांवुडीला न्हेलं. आज सांच्याला ती येणार व्हती तिच्या मामासंगंत हिकडं. पर काय झाला घोटाळा देव जाणं....'

हा खुलासा ऐकल्यावर सखा रंगाचा चेहरा एकदम पडला. त्यांचा उत्साह खलास झाला. त्याना वाटलं, लगेच फिराडू व्हावं. पण म्हातारीनं रंगाची माहिती मिळाल्यावर चुल्खांडावर शेवया उकडाया ठेवल्या. म्हातारी त्याना जेवल्याशिवाय जाऊ देणार नव्हती. म्हणून ते गपगुमान बसले होते. तरी त्यांच्या मनातील हेतु ओळखून अनुभवी म्हातारी बोलली,

'तुमी दोगं माहं जावाय. तुमाला शेवाया जेवू घातल्याखिरी मी कसं जाव दिवू? जेवल्याव खुश्याल निघा... आन जत्रेला जावा पिराच्या.'

'पर मामी, मला माही वह्यनी पगायची व्हती व!' धीट रंगा बोलला.

'हाच त समदा घोटाळा. आत्ता तुमी आसं करा रंगराव.'

'काय?'

'दोन दिसानं तुमी उजून या... म्हई तव्हर पोर बी तिचा मामा हिकडं आणून सोडील.' त्यावर रंगानं सखाकडं उदासवाणी पाहिलं. पण आता विलाज नव्हता. सखाला आईच्या शब्दांची आठवण झाली. तो बोलला,

'मामी, आमाला लोंच्याला कैरी तुम्या ठुवलीत म्हणे?'

'व्हय जावाय. तुमी आता जत्रंला जानार. सकाळी तमाशा मोडल्यावर हिकडं धक्कट या. आन लोंच्याला कैरी घ्यवून जावा. चालंल?'

'हुं.' रंगा सखा नाराजीनं बोलले.

रगडून जेवण झाल्यावर सखा रंगा पिंपरी पेंढारच्या रस्त्याला लागले. रस्त्याने माणसं बी लय वहात होती. गांवच्या वेशीत जेव्हा त्या दोघांनी पाय ठेवला तेव्हा छबीना निघाला होता. छबीना बघायला अलोट गर्दी जमली होती. सखा रंगाला तर खाली पाय देखील ठेवणं कठीण झालं होतं. त्यामुळे त्यांना आत चाललेला लेझीम, काठी, व्हडगं, बॅंडच्या आवाजावर नाचणारं घोडं... असे कितीतरी खेळ बघता येईनात. रंगा काय पहिलवान माणूस. तो ढुसणी मारून आत घुसला. त्याच्या पाठोपाठ सखाहि घुसू लागला. पण कमजोर सखाचा मागं कोल्या झाला. सखा पाठोपाठ येतोय, ह्या कल्पनेनं दांढार रंगा मागे न बघता पुढं पुढं घुसत होता. ढुसण्या देऊन गर्दी कापत होता. रंगाला जेव्हा आतील सर्व खेळ नीटपणे बघता येऊ लागले, तेव्हा तो थबकला. पण स्वतःच्या पाठीमागे त्याला सखा दिसेना. त्याचा तपास करायला निघावं, तर खेळ बघता येणार नव्हते. म्हणून खेळाडू रंगाला जागचं हलूंशी वाटेना. छबीना मोडल्यावर सखाची आणि आपली आपसुक्यास गाठ पडेल, ह्या मोघम कल्पनेवर तो खेळ बघत राहिला. त्यातच दंग झाला...

छबीना जेव्हा मारुतीच्या देवळापुढील भव्य पटांगणात आला तेव्हा रंगानं पिंपळाच्या पाराजवळ उभ्या असलेल्या पोरींच्या घोळक्याकडे पाहिलं. त्या घोळक्याच्या मधोमध उभ्या असलेल्या एका देखण्या तरण्याताठ्या पोरीला पाहून तर तो एकदम चाट पडला. चकित झाला. ती पोरगी तारुण्यानं नुसती मुसमुसली होती. तिच्या डोळ्यातील ते वेगळेच तेज–गॅसबत्तीच्या उजेडात तिचं ते मोह पाडणारं स्वरुप भलतंच उठून दिसत होतं.

आजपर्यंत कोणत्याच स्त्रीला स्पर्श न करणारा पहिलवान रंगा त्या पोरीच्या रुपानं काहीसा चाळवला...पागल झाला. मग त्यानं छबीना बघायचा सोडून दिला.

अनुक्रमणिका

त्या रूपवान पोरीकडंच नजर लावून राहिला. त्या पोरीच्या पाळतीवर राहिला. पोरींच्या घोळक्यातून ती पोरगी जिकडं जाईल तिकडं तो मंतरल्यागत जाऊं लागला. तिची प्रत्येक हालचाल आपल्या पेटल्या नजरेनं टिपू लागला...

स्त्रीचा द्वेष करणाऱ्या रंगाला आज असं एकदम कां व्हावं, हे त्याचं त्यालाच कळेना. समजेना...

अखेर रात्री एक दीडला छबीना फुटला गेला. गांवाबाहेर अर्ध्या मैलावर पिराचं ठाणं होतं, तिथंच त्या भागातील एक नामांकित तमाशा उभा राहणार होता. म्हणून तिथं चांगली जागा पकडण्या-साठी सारं 'पब्लिक' खुळ्यागत पळत सुटलं होतं.

त्या सुंदर पोरीबरोबरच्या पोरीसुद्धा केव्हाच जागा धरण्यासाठी पिराकडं गुल झाल्या होत्या. ती पोरगी मात्र कुणाला तरी शोधण्याचा प्रयत्न करीत होती. थोडयाच वेळात गावात माणसं थोडीशीच दिसू लागली. मग मात्र ती पोरगी रडकुंडीस आली. पदरानं डोळं टिपू लागली. रंगाला वास्तविक तिची कीव यायला हवी होती. पण त्याची त्यावेळी तिच्याकडे बघण्याची दृष्टि वेगळी होती.

हवं असणारं माणूस सोबतीला मिळेना, म्हणून ती मोठ्या धाडसानं गांवाबाहेर पिराजवळ उभ्या राह्यलेल्या तमाशाकडं निघाली. गांवातली माणसं तर केव्हाच पिराकडे फुटली होती. हाताच्या बोटा-वर मोजण्याजोगीच माणसं गांवात होती...म्हणून ती गांवाबाहेरील पिरा-कडं निघताना लटलटा कापू लागली. कावरी बावरी होऊं लागली. आपल्या मागावर कुणी नाहीना ह्याचा चोक्सा-ईनं अंदाज घेऊं लागली...

सगळ्यांना थरारून सोडणाऱ्या अंधाऱ्या वडाखालून दोन वाटा फुटत होत्या. एक वाट पोटे मळ्याकडं, दुसरी वाट पिराकडं. पिराच्या वाटेला लागण्याआधी त्या तरण्याताठ्या पोरीनं डोळे फाडफाडून मागं पुढं पाहिलं. मागं पुढं लांब लांब अंतरावर माणसं पिराकडं चालत जात होती. तिच्या आसपास मात्र कोणीच दिसत नव्हतं. म्हणून ती त्या भयाण अंधाऱ्या वडाखालून धडधडत जाऊं लागली. तो वडाच्या थोराड खोडा-आड आधीच दबा धरून बसलेला धाडशी रंगा चपळाईनं पुढं झाला...

आणि ती पोरगी अस्पष्टशी किंचाळून जागच्याजागी कोसळली...

सकाळी तमाशा मोडल्यावर सखा रंगा कुठं थांबलेच नाही. जागृतीनं दोघांचेही डोळे दुखत होते म्हणून ते सरळ सासुर-वाडीच्या गांवाला आले. पडाळीत त्यावेळी सखाची सासू त्यांची वाटच बघत होती. दांत घासून तोंडबिंड धुऊन सखा रंगा पितळ्यातून चहा प्याले.

पडाळीतल्या कोपऱ्यातील कैऱ्यांची पाटी त्यांच्यापुढं सारीत सासू त्या दोघाना म्हणाली,

'जावाय्, ह्या घ्या तुमासाटी राखून











टुलेल्या लोंच्यासाठी कैऱ्या..'

'पर ह्यात डागली विगलीली कैरी त न्हाय ना मामी?' सखा आईचं बोलणं आठवून म्हणाला.

'आसली त ठुवा यकांगं. तिचं मालिक आमी...खराय कनी रंगराव?'

—म्हातारीनं रंगाकडं हंसून पहात म्हटलं. त्यावर रंगानं नुसती मान हलवली.

मग दोघेही पाटीतील कैऱ्या निवडायला बसले. पाटीत सर्व कैऱ्या चांगल्या होत्या. तरी त्यात एक डागळलेली कैरी निघालीच. सखाच्या हातातून ती घेत रंगानं बाजूला ठेवली... आणि मग कैऱ्यांचं गठूडं बांधण्यात आलं.

बाहेर कुणाची तरी पावलं वाजली. रंगाचं उर उगाच धडधडलं. सखाची नवरी पदर आडवा करून आत आली. तिला बघून म्हातारी रंगाला चमकून म्हणाली,

'रंगराव, बगा ही तुमची वह्यनी..'

रंगाची आणि तिची नजरानजर झाली...तसा तिनं खालचा ओठ दांताखाली कडकडून चावला. तिच्या डोळ्यात पाणी तरारलं.... आणि रंगाच्या काळजाचं पाणी पाणी झालं...

'पोरी, तूं आन तुहा मामा काल सवंसांजेला यणार व्हते ना, ग?'

'व्हय. पर पिंप्रीतच यतानी गडात पडलं. म्हून तिथंच जत्रा पगाया ठरलो...'

'मंग तुहा मामा कुठाय?"

'राती छबीना पगतानी त्येची आन् माही चुकामूक झाली गर्दीत...' जड आवाजात ती बोलली.

रंगाच्या डोळ्यासमोर अंधाऱ्या वडाखालचा रात्रीचा तो वासनेत बुडालेला प्रसंग उभा राहिला...

घरी निघताना सखा कैऱ्यांचं गठूडं डोक्यावर घेऊ लागला. तेव्हा रंगानं बाजूला ठेवलेली कैरी हातात घेतली. अन् ती गठुड्यात ठेवीत तो सखाला कंपित आवाजात बोलला,

'सखाहरी, तुह्या पाया पडतु मी. पर ही डागलीली कैरी तुह्या घरी न्हे पण.... उगा त्या बिचारीला दोस दिवू नकोस,..'

●●●




# मराठी माणसा, अंतर्मुख हो

-म. शा. दाबके



**पराभूत** दर्यासारंगाला एखाद्या कोळ्याने देखील युद्धशास्त्राचा वस्तुपाठ द्यावा हा मानवी स्वभावच आहे. मराठी माणसाचे सुद्धा आज असेच झाले आहे. संयुक्त महाराष्ट्र होऊन अनेक वर्षे लोटली तरी उर्जितावस्था त्याच्या नजरेच्या टप्यात काही अजून येत नाही. त्या चिंतेत तो चूर झाला आहे. तशातच जो उठतो तो आपला त्याला अक्कल शिकवीत सुटतो. "महाराष्ट्रीय समाजाने अजून पुष्कळच शिकायला हवे आहे" मुंबईत आपले बस्तान नीट बसविलेला परभाषीय साळसूदपणाचा आव आणून म्हणतो. तर, "आपले लोक ना, नाहीच सुधरायचे ते," दैववशात ऊच्चपदी पोचलेला मराठी माणूस त्याची उघड हेटाळणी करतो. परभाषीयांचा मानभावीपणा आणि स्वकीयांचा सहानुभूतीशून्य पवित्रा ही दोन्ही मराठी माणसाला विद्ध करतात, त्याच्यात वैफल्य निर्माण करून त्याचा तोल सुटण्यास कारणीभूत होतात. मराठी माणसांचे न्याय्य हक्क जतन करण्याच्या हेतूने सुरू झालेल्या चळवळीत अनाचार घुसतो तो ह्यामुळे. असे असले तरी आपण हे जाणले पाहिजे की महाराष्ट्रातील मराठी समाजाची पिछेहाट ही एखादी अस्मानी आपत्ती नसून ती एक अखंडपणे सुरू असलेली प्रक्रिया आहे. किमान गेली ४० वर्षे तरी मराठी माणूस मागे रेटला जातो आहे. आज खुद्द महाराष्ट्राच्या राजधानीत त्याची होणारी दमछाक हा ह्या चाळीस वर्षाच्या परागतीचा परिपाक आहे. ह्या गर्तेतून एका रात्रीत बाहेर निघता येणार नाही. कारण एका रात्रीत आपली रवानगी तेथे झालेली नाही. आणि म्हणूनच पुढची आखणी करण्यासाठी इतिहासाचा मागोवा घ्यावा लागेल. त्याचप्रमाणे आपले नेमके भांडण कुणाशी असले पाहिजे हे शांतपणे ठरवावे लागेल. नंतर प्रश्न येतो तो दुर्बलता नाहीशी करून शक्तीची केंद्रे अधिक सामर्थ्यवान करण्याचा. असा योजनाबद्ध प्रयत्न झाला तरच येत्या १० ते १५ वर्षात आजचे चित्र थोडे तरी पालटलेले दिसेल. अन्यथा भांडकुदळपणाचा टिळा कपाळी लागण्याहून फारसे काही पदरात पडणार नाही.

## इतिहासाचा मागोवा

मुंबई हे भारतातील सर्वोत्कृष्ट बंदर असले, तरी विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत 'भारताचे प्रवेशद्वार' इतकेच तिचे महत्व मर्यादित होते. येथे कायमची वस्ती असे ती फक्त कोळ्यांची. दरिद्री मारवाडातून मुंबईत येणारे लोक महाराष्ट्राच्या इतर भागांमध्ये पेगम करीत. त्यानी क्रमशः खेड्यातील सावकारी हातात घेतली. मागोमाग आलेल्या गुजरात्यानी दुकानदारी काबीज केली. अशा तऱ्हेने – एक शेतीचा अपवाद सोडता – मराठी माणसाने आपले सर्व व्यवसाय चार शतकांपूर्वीच परप्रांतीयाना घेऊ दिले. तेव्हा सुबत्ता होती. ते डाचले नाही. शिक्षणाचा प्रसार व शेतीचे अपुरे पडणारे उत्पन्न यामुळे महाराष्ट्राचा मध्यमवर्गीय आणि मजूर नोकरीसाठी मुंबईकडे धाव घेवू लागला. तो तेथे सुद्धा त्याला परप्रांतीयांशी स्पर्धा करावी लागली. गिरणीतील नोकरी ही जणू त्याकाळी कामधेनूच होती. पण तेथे देखील उत्तरोत्तर मराठी-मजुरांची टक्केवारी घटत गेली. (पहा तक्ता क्र. १) नोकरीसाठी मुंबईत येणाऱ्या सुशिक्षित मराठी मध्यमवर्गीयापुढे स्पर्धेचा एक नवाच भस्मासूर उभा राहीला. तो म्हणजे मुंबईत प्रत्यही लाटांप्रमाणे रिचवणारे दक्षिण भारतीय. दारिद्र्य, बुद्धीची देणगी, शिक्षण आणि महत्वाकांक्षा हे दोन्ही समाजातील समान घटक. जशी नोकऱ्यांची दुर्मिळता होवू लागली तसा दोन समाजांमध्ये दुरावा भासू लागला. उच्चपदस्थ महाराष्ट्रीयांची स्वकीयांबद्दलची उदासीनता आणि दाक्षिणात्यांचे आड मार्गाने आपला मनुष्य चिकटविण्याचे कसब आणि चिकाटी यामुळे मराठी तरुणाच्या डोळ्यासमोर अंधारी आली, तो गांगरला. आज रौद्ररूप धारण करू पाहणाऱ्या प्रांतिक वैमनस्याचे धागदोरे असे दूरवर पसरलेले आहेत.

## माल्थस पराभूत

जन्म आणि मरण यांच्या प्रमाणांचा छेद दिल्यास, मुंबईची लोकसंख्या प्रत्येक दशकात २०% टक्क्याहून अधिक वाढण्याचे कारण नव्हते. पण प्रत्यक्षात ती कशी भरमसाट वाढते आहे, त्याचा मागोवा घेण्यासाठी तक्ता क्रमांक दोनवर जरा नजर टाका. टक्केवारीच्या भाषेत बोलावयाचे झाल्यास, १९३१–४१ या दशकात मुंबईची लोकसंख्या २८.५ % ने वाढली. १९४१–५१ मध्ये तिने ६६.६ % इतकी जबरदस्त आघाडी मारली तर











अनुक्रमणिका

१९५१–६१ ह्या अवधीत ती ३८% फुगली. "लोकसंख्या भूमीतीच्या श्रेणीने (Geometrical Progression) वाढते" असा सिद्धांत मांडणाऱ्या माल्थसने लोकसंख्या वाढीचे म्हणून जे भाकीत केले आहे, त्याहून कितीतरी अधिक प्रमाणात मुंबईची लोकसंख्या वाढली. म्हणजेच मुंबईत माल्थस पराभूत झाला. हे असे कां घडले ? त्याचे उत्तर असे आहे—

### भरमसाट आयात

गेल्या ५० वर्षांमध्ये मुंबई शहरात वाहेरून माणसांची जितकी आयात झाली तितकी अन्य कोठे झाली नसेल. आपल्या तक्ता क्र. २ मध्ये जी कालगणना झाली आहे तीतून आपण १९४१–५१ ह्या दशकामध्ये जी वाढ झाली ती क्षणभर क्षम्य समजू या. कारण १९४७ हे फाळणीचे वर्ष त्या कालखंडात येत असल्याने सिंधमधून स्थलांतर करणाऱ्याना निवारा देणे हे राष्ट्रीय कर्तव्यच होते. आणि राष्ट्रीय कर्तव्य करताना कुरकुर अथवा कुचराई केल्याचा महाराष्ट्राचा इतिहास नाही. पण त्याशिवाय जी मुंबईत परप्रान्तीयांची सतत रीघ लागली आहे त्याचे काय ? त्यावर कुणी असे म्हणेल की खुद्द महाराष्ट्राच्या इतर भागांतून देखील मुंबईत माणसे आलीच की. हे खरे असले तरी महाराष्ट्राचे एकमेव आशास्थान असलेल्या मुंबईकडे धाव घेणाऱ्या मराठी मंडळींची संख्या ही टोळांच्या थव्यांप्रमाणे येथे रिचविणाऱ्या अन्य प्रांतीयांपेक्षा कितीतरी कमी होती. याचा अत्यंत वोलका पुरावा म्हणजे अविकृत आकडे एकत्र करून तयार केलेला तक्ता क्र. ३.

**मराठी माणसांची संख्या घटत असल्यावद्दल चिंता व्यक्त केली की तिला उत्तर म्हणून नगरपालिकेच्या प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांची आंकडेवारी देण्याचा एक प्रघात पडतो आहे. एवढे खरे की १९६६ च्या अखेर मुंबई महानगरपालिकेच्या प्राथमिक शाळांमध्ये एकूण पटावर असलेल्या ५१४४५५ विद्यार्थ्यांपैकी ३०५६७५ विद्यार्थी मराठी भाषिक होते. पण हे आकडे नजरेत धूळफेक करण्यास पुरेसे असून खरे चित्र ते पुढे मांडीत नाहीत. एकतर ५:३ हे प्रमाणच मुळात फारसे फुशारण्याजोगे नाही. दुसरे असे की आर्थिक स्थिती प्रत्यही खालावत असलेल्या मराठी माणसांची बहुतेक सर्व मुले महानगरपालिकेच्या शाळांतून शिकतात तर येथे येवून आपला जम नीट बसविलेल्या परप्रान्तीयांची मुले कॉन्व्हेंट व इतर महागड्या खाजगी शाळांतून**

**तक्ता क्र. १ : मुंबईत बाहेरून येणाऱ्या कामगारांचे कापड गिरण्यातील प्रमाण (%)**

| ठिकाण | सन १९११ | सन १९२१ | सन १९३१ | सन १९४० | सन १९५४ |
|---|---|---|---|---|---|
| रत्नागिरी जिल्हा | ४९ | ३५ | २५ | — | — |
| सातारा जिल्हा | ७ | ६ | ५ | — | — |
| कुलावा जिल्हा | ६ | ४ | ३ | — | — |
| कोल्हापूर जिल्हा | ३ | १.७५ | ०.५० | — | — |
| उत्तर प्रदेश | ३ | ९.५० | १२.०० | — | — |
| ७५१ मैलांहून अधिक अंतरावरून (म्हणजेच महाराष्ट्राच्या वाहेरून) येणारे कामगार | ३ | १०.५० | १५.०० | २० | २२ |

**तक्ता क्र. २ : मुंबईची लोकसंख्या**

| वर्ष | लोकसंख्या | वाढ (%) |
|---|---|---|
| १९३१ | १३,९७,८१२ | — |
| १९४१ | १८,०१,३५६ | २८.५ |
| १९५१ | २९,९४,४४४ | ६६.६ |
| १९६१ | ४१,५२,०५६ | ३८.० |

**तक्ता क्र. ३ : मुंबईतील माणसांची आयात–१९६१**

| | एक वर्षाच्या आतील | | १ ते ४ वर्षे | | ५ ते ९ वर्षे | | १० ते १४ वर्षे. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया |
| महाराष्ट्रीय | ४४,००६ | ३७,७८९ | १,३४,२३६ | ८९,४०६ | १,२१,००५ | ७१,८६० | १,१७,४९८ | ६६,८६७ |
| अन्य प्रांतीय | ८०,०४८ | ४३,३९० | २,००,६७२ | १,०६,५६९ | १,७६,९३८ | ९४,६३० | २,०८,२०१ | १,१९,४०५ |
| एकूण | १,२४,०५४ | ८१,१७९ | ३,३५,९०८ | १,९५,९७५ | २,९७,९४३ | १,६६,४९० | ३,२५,६९९ | १,८६,२७२ |

शिकतात. हे सर्व जमेस धरले की **मराठी विद्यार्थ्यांचे बहुमत खूपच कमी असल्याचे आपल्याला आढळेल.**

## "विश्वास सोडुनी गेला"

अशा तऱ्हेने चहूबाजूने कचाटचात सापडलेला मराठी मनुष्य संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेकडे डोळे लावून बसला होता. एखादी गांजलेली विधवा डोळचात प्राण आणून मुलगा मोठा होण्याची दररोज वाट पहाते ना ? तस्सा. आणि महाराष्ट्र आला. त्यात संयुक्त महाराष्ट्र समितीच्या भीम पराक्रमाचा सिंहाचा वाटा होता. मुंबई महानगरपालिका समितीच्या हाती आली. वास्तविक मराठी माणसाच्या उत्कर्षाचे केवढे दैदिप्यमान पर्व तेथून सुरू व्हावयास हवे होते. पण. . . सत्तेच्या पिंजऱ्यातील पाखरांची फडफड दिल्लीकरांची थप्पड बसताच थांबली. संयुक्त महाराष्ट्र समितीची परिणती राजकीय डावपेचांच्या अड्डयात होवून म्हैसूरबरोबर भांडणे हेच एकमेव कार्य तिला उरले. पानपतच्या लढाईत विश्वासराव पडले आणि सदाशिव भाऊंनी हुंदका दिला, "विश्वास सोडुनी गेला." समितीच्या राजकारणाची ससेहोलपट बघून, महाराष्ट्र होवूनहि पोरक्याच राहिलेल्या मराठी माणसावर हाच दुःखोद्गार काढण्याची पाळी आली आहे. महाराष्ट्राच्या स्थापनेने लढाई जिंकली असली, तरी संग्राम अजून सुरूच आहे. आणि पहिल्या फेरीतील विजयानेच धुंद झालेले नेते स्वतःचे ढोल बडवीत निघून गेले आहेत. आता पुढचा लढा हा सामान्य माणसाने स्वतःच लढवायचा आहे.

अर्थात ह्या लढचाची देखील काही खास पथ्ये आहेत. जितक्या कांटेकोरपणे आपण ती पाळू तितका विजय नजीक आणि निश्चित. त्यातील पहिले पथ्य असे की लोकशाही चौकटीत होणाऱ्या ह्या चळवळीत कुठल्याहि प्रकारची हिंसा, अनाचार वा नासधूस होता कामा नये. कारण त्यात आपलीच सर्व प्रकारची हानी आहे. तसेच, त्या लढाईला प्रान्तीय विद्वेषाचे स्वरुप कदापि येता कामा नये. कारण, राजकीय पुढाऱ्यांनी स्वतःच्या वर्तणुकीने भावनात्मक ऐक्य (Emotional Integration ) या शब्द-प्रयोगास कितीही हास्यास्पद करून सोडले असले तरी एक राष्ट्र म्हणून आपल्याला जगावयाचे असल्यास, राष्ट्रीय एकतेत बिब्बा घालणारे कुठलेहि वचन वा लेखन आपण कटाक्षाने टाळले पाहिजे. संपूर्ण मराठी समाजाचे पुनरुथ्यान हे उद्दीष्टच इतके मोठे आहे की त्यासाठी सरकारच हालवावे लागेल. चार-दोन विक्रेत्याना जेरीस आणण्याचे कोते तंत्र त्यात बसूच शकत नाही. आणि सर-कारला कार्यप्रवण करण्यासाठी मोर्चे सचिवालयावर जायला हवेत, एखाद्या परप्रान्तीयाच्या हॉटेलवर नव्हे. हॉटेलवर मोर्चा नेल्याने सरकार हलत नाही, पोलीस खाते हलते.

## नवे प्रमेय येत आहे

हल्ली आहे ही परिस्थिती कमी बिकट आहे म्हणून की काय, एक नवे प्रमेय घाटत आहे. मुंबई विद्यापीठाचे एक ज्येष्ठ प्राध्यापक आणि माझे एके काळचे गुरु असलेल्या एका अर्थ पंडितांच्या डोक्यात हे प्रमेय शिजत असल्याचा नुकताच अंदाज लागलेला आहे. ते प्रमेय असेः मुंबई व आसपासच्या प्रदेशाचे ज्या वेगाने औद्योगि-करण होत आहे तो वेग कायम ठेवणे मुंबईच्या व देशाच्या हिताच्या दृष्टीने आवश्यक आहे. (इथवर कुणाचे फारसे दुमत होणार नाही) त्यासाठी परप्रांतांतून मनुष्यबळ आणणे भाग आहे. **कारण महाराष्ट्राच्या आंतरिक भागातील ( Interior ) बहुतेक सर्व मनुष्यबळ मुंबईंत अगोदरच रोजगारी करीत असल्याने महाराष्ट्रात आता श्रमिकांचा तुटवडा पडू लागला आहे. करिता मराठी माणसानी बाहेरून येणाऱ्या मंडळींविरुद्ध आग पाखडू नये.** हे नवे प्रमेय म्हणजे महाराष्ट्राला विशाल दृष्टीकोनाचे धडे येता–जाता देऊ बघणाऱ्यांच्या हातातील एक अमोघ अस्त्रच ठरणार आहे. तशात, जे सज्जन ते मांडणार आहेत, त्यांचा आर्थिक क्षेत्रातील अधिकार अतिशय मोठा असल्याने, ह्या प्रमे-याचा अत्यंत उदोउदो होऊन मराठी मनुष्य अधिकच गोंधळात पडणे शक्य आहे. पण त्याला फारसे घाबरण्याचे प्रयोजन नाही. कारण ह्या प्रमेयाची दुसरी बाजू देखील अर्थकारणाचीच कांस धरून तितक्याच कणखरपणे मांडता येईल व मांडणारे योग्य वेळी ती मांडतीलही. येथे हा उल्लेख करण्याचे कारण इतकेच की क्षितिजावरील नव्या संकटाच्या सांवटाची आपल्याला पूर्वसूचना असावी.

## चेंडू उसळी मारणारच

दडपला गेल्याने निपचीत न राहण्याचा चेंडूचा स्वभावधर्म आहे. किंबहुना जितके दडपण अधिक तितका उसळी मारण्याचा त्याचा जोम जास्त. पण अशी उसळी मारण्यासाठी मुळात चेंडूमध्ये हवा असावी लागते. नाहीतर हा हा म्हणता त्याचा रबराचा लोळागोळा होवून जातो. व्यक्तीचे किंवा समाजाचे सुद्धा असेच असते. प्रतिकूल परिस्थितीला किवा संकटांना भीक न घाल-ण्याची बेदरकार वृत्ती. . . तिची महाराष्ट्रात वाण नाही. . .



संस्थानिकांचे तनखे कॉंग्रेस बंद करणार !









नुसती असून चालत नाही तर तिला अफाट प्रयत्नांची जोड मिळावी लागते. चांगले नेतृत्व लाभले की त्याच्या मार्गदर्शनाखाली संपूर्ण समाज मोठ्या जोमाने वाटचाल करू शकतो. पण तेच नेतृत्व नसले– किंवा लेचेपेचे असले की त्या समाजाच्या वाटचास पोरक्या पोराचे आयुष्य येते. मग प्रत्येक व्यक्तीने धडपड करून आपला उत्कर्ष साधायचा एवढेच शिल्लक उरले. असे करणे अधिक विकट तर खरेच, पण मराठी समाजाच्या पुढयात निदान आजतरी तेच वाढून ठेवलेले दिसते. नगरपालिका, विधानसभा, संसद येथे बसणारे आपले प्रतिनिधी म्हणजे जणु आपली शक्तिकेंद्रेच. पण या मान्यवरानी महाराष्ट्राचे दुःख वेशीवर टांगण्याचा कितपत प्रयत्न केला ? त्यानी काहीच केले नाही असे कसे म्हणावे ? पण अर्ध्या शतकाची पिछेहाट काही अर्धा डझन प्रश्न विचारून आणि पाव डझन सभात्याग करून नाहीशी होत नाही. त्यासाठी सतत प्रयत्न करावा लागतो. प्रसंगी परप्रांतीयांची नाराजी पत्करावी लागते. असा नेटाचा प्रयत्न कितपत झाला आहे, याविषयी अधिक लिहिणे नलगे.

## संधी हेच कर्तव्य

"संधी हेच कर्तव्य मानून तीवर झडप घातली पाहिजे" अशा आशयाचे एक वाक्य 'धी प्रिझनर ऑफ झेंडा' ह्या कादंबरीत आहे. येथून पुढे हेच आपले ब्रीदवाक्य असले पाहिजे. यावर कुणी असे म्हणेल की "अहो, आम्हाला संधीच मिळत नाही." पण हे फारसे खरे नाही. कित्येकदा आलेली संधीच मुळी आपल्याला ओळखता येत नाही. एक अतिशय साधा प्रयोग आपणा सर्वांना करून पाहता येण्याजोगा आहे. नोकरी, त्यासाठी करावा लागणारा प्रवास वगैरेची जिकीर सगळ्यांच्या मागे लागलेली असते हे तर खरेच. पण त्याचबरोबर प्रत्येकाला थोडी ना थोडी फुरसद असतेच हे सुद्धा तेवढेच खरे आहे. त्यातील वेळ इतरांच्या कुचाळक्या करून आपण वाया किती घालवितो व सत्कारणी किती लावतो हा एक प्रत्येकाने स्वतःस विचारण्याजोगा प्रश्न आहे. "ही आमची खाजगी बाब आहे" असे म्हणून ह्यातून सुटका होणार नाही. कारण, "आमच्या समाजाची पिछेहाट होते आहे हो ऽ" अशी बोंब एकदा का आपण चावडीवर नेली की आपण करीत असलेल्या प्रयत्नांचा. . . म्हणजेच आपल्या दैनंदिन जीवनाचा. . हिशेब मागण्याचा अधिकार देवडीवाल्यापासून सगळ्याना मिळालाच म्हणून समजा. लघुलेखन, टंकलेखन, कलाकुसर, संगीत अशा किती तरी क्षेत्रांमध्ये फावल्या वेळात शिरकाव करून आगेकूच करणे प्रत्येकास सहज शक्य आहे. यामुळे व्यक्तीचे जीवन तर समृद्ध होतेच पण हळूहळू आर्थिक आवक सुद्धा होऊ लागते. पण त्यासाठी चिकाटी मात्र हवी. माणसाच्या अंगचे दोष त्याच्या सद्गुणांना काळवंडून टाकून त्याचा पायगोळा करतात. त्यामुळे प्रगतीची वाट चोखाळण्यासाठी आसुसलेल्या समाजाला परखडपणे आत्मपरिक्षण करून ते दोष झटकून टाकण्याखेरीज गत्यंतरच नसते.

## येशील कधी परतून ?

बोलणे आणि वागणे यात विसंगती दिसली रे दिसली की आपल्या उण्यावर टपलेल्याना चोंच मारण्याची संधी मिळालीच म्हणून समजावे. नुकतीच घडलेली एक लहानशी गोष्ट येथे नमूद करण्याचा मोह अनावर होतो. एका रविवारी सकाळी माझ्या एका लेखक मित्राकडे गप्पा मारीत बसलो होतो. तेवढ्यात एक १२–१४ वर्षांचा गरीब विद्यार्थी मदत मागण्यासाठी आला. त्याला माझ्या मित्रांनी सांगितले की "बाळा, नुसतेच पैसे मागणे भीक मागण्यासारखे आहे. तू असे कर, माझ्या वर्तमानपत्रांची आंखून दिलेली कात्रणे मला कापून दे. एका वर्तमानपत्राची कात्रणे कापलीस की मी तुला दहा पैसे देईन. महिन्याला जवळपास शंभर अंकांची कात्रणे काढावी लागतात. पंधरवड्यास रविवारी दोन तीन तासात हे काम सहज उरकेल." संध्याकाळी येण्याचा वायदा करून ते पोर जे पसार झाले ते दोन महिने झाले, तरी अजून येतेच आहे ! !

## तारुण्याचा काळ श्रमाचा

त्या लहानग्या पोराला देखील मी फारसा दोष देत नाही. नेट सोसायचा म्हटला की हल्ली मुळी जीवावरच येते. तशात भाऊ, बहीण शेजारी पाजारी वगैरेकडून गुंगारा देण्याचे नित्य घडणारे प्रकार त्याच्या नजरेसमोर असणार. पण मुळात आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की **तारुण्यात सुखासीनतेला वाव नाही. तो आळस नांवाचा महाभयंकर दुर्गुण ठरतो. त्याचप्रमाणे आर्थिक क्षेत्रातील उत्कर्ष हे भांडवल अधिक श्रम यांचे फलित असून त्या रोखठोक सिद्धांताला पर्याय नाही.** चांदीचे वाळे खुळखुळ करीत जन्माला येणाऱ्याना सुद्धा श्रमांची जोड देवून संपत्तीची आराधना करावी लागते. नाहीतर ती रुसते. आपण तर जन्मतःच दरिद्री. त्यामुळे भांडवल निर्माण करायचे ते सुद्धा श्रमांतूनच. मग आपण दुप्पट काबाडकष्ट उपसले पाहिजेत, हें ओघानेच आले. तसेच परिश्रम ही एक साधना आहे. ती क्षणाक्षणाने आणि कणाकणाने सिद्ध होते. आणि हे सर्व तारुण्यात– चाळीशी पार करण्यापूर्वीच–करता येते, नंतर नाही. तारु-

ण्यात उपसलेल्या कष्टांनी काही हानी होत नाही, झाला तर फायदाच होतो. आणि तो फायदा म्हणजे उत्तरायुष्यात सुखा-समाधानाने जगण्याची तरतूद स्वतःपाशी तयार होते. पण दुर्दैवाने हे कष्ट फारसे कुणाच्या गावीच नसतात. दुधाच्या धंद्यावर गबर झालेला उत्तर प्रदेशीय गवळी आपल्या डोळचात सलतो. पण, गवत आणि म्हशी ह्यांच्यामध्ये अंगाची मुटकुळी करून तुटपुंज्या झोपेच्या त्याने घालविलेल्या हजारो रात्री आपल्याला दिसत नाहीत. साहेबाचे लांगुलचालन करून वढलेला दाक्षिणात्य पाहिला की आपण बोटे मोडतो. पण नोकरीच्या प्रारंभात त्याने दिवसातून बारा बारा तास काम करून साहेबाची मेहेरनजर स्वतःकडे वळविलेली असते इकडे आपला काणाडोळा होतो. इतकेच काय, पण (तुरळक अपवाद वगळल्यास) आज यशस्वी जीवन जगत असलेल्या शेलक्या मराठी मंडळीनीहि कष्ट उपसतच शिडीचे वरचे टोक गाठले आहे हे मान्य करण्यास आपण राजी नसतो. साधनेची गंमतच अशी आहे की ती सिद्ध होत नाही तोवर मागून मानमरातब मिळत नाही. आणि एकदा ती सिद्ध झाली की मानसन्मान कुणाला काढून घेता येत नाही. आपल्या समाजाचा परिश्रम करण्याचा निरुत्साह कै. स. गो. वर्वे यानासुद्धा डांचत असे. "आपल्या लोकांना कष्ट करायला नकोत हो." मितभाषी बर्वे खाजगी संभाषणात व्याकुळतेने म्हणत.

**अणुहि नच उणे**

एवढा एक मोठा दोष सोडला तर मराठी लोक बुद्धी, आकलन शक्ती इत्यादि बाबतीत परप्रांतीयांहून मुळीच उणे नाहीत, किंबहुना कांकणभर सरसच आहेत, याची इतरांना तीव्र जाणीव आहे. म्हणूनच मराठी माणसाला नामोहरम करण्यावर त्यांचे नेहमीच एकमत असते. वकील, वैद्यक, पत्रकार वगैरे प्रत्येक क्षेत्रात मराठी माणूस परप्रांतीयापेक्षा पाऊलभर पुढेच असलेला आपणाला दिसेल. इंग्रजीतून लिखाण करणारे मराठी लेखक थोडे असले तरी अल्पावधीतच त्यानी आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळविल्याचे चेतोहारी दृश्य आपणास दिसते. मराठी माणसाहून दाक्षिणात्याचे इंग्रजी अधिक फरडे असते, ह्या भ्रमाचा भोपळा फोडण्याची वेळ आता येवून ठेपली आहे. कॉन्व्हेंटमधील शिक्षणामुळे जे संभाषण-चातुर्य अंगी येते, त्यामुळे अनेक प्रसंगी दाक्षिणात्यांची प्रथमदर्शनी छाप पडते हे खरे. पण जेथे लिहिण्याचा प्रसंग येतो, तेथे दाक्षिणात्यांच्या चुका अधिक आणि भाषा क्लिष्ट असा अनेकांचा अनुभव आहे. इतरानीहि निरीक्षण करून त्याचा पडताळा पहावा.

महाराष्ट्रात जीवनाचा प्रारंभ होतो तोच मुळी 'भारत माझा देश' ह्या ललकारीने. "चौदांची एकच जिव्हा" हा आदेश देणारा कवी येथेच निघाला ना? पण देशभक्ती करण्यासाठी मुळात मराठी समाज सन्मानाने जिवंत तरी राह्यला हवा की नाही ? महाराष्ट्रात मराठी माणूस खरंच सुखासमाधानाने जगू शकला, सर्वत्र आबादी आबाद झाली तर आम्हीच अन्य भाषियाना मोठ्या आनंदाने आवाहन करू, "या मित्रांनो, या. तुम्ही-आम्ही एकाच आईची लेकरे आहोत."

• • •



फुलांच्या सुगंधाने आधीच धुंद झालेला दादू त्या रमणीचे चुंबन घेताच मारे बेहोष झाला. आपल्याच तंद्रीत बेभानपणे डोळे मिटून जागच्या जागी उभाच राहिला.... अगदी शुंभासारखा....

—पंढरीनाथ रेगे

# दर्द कहाँ? इलाज कहाँ?

**दादूने** आतापर्यंत काही थोडच्या चोऱ्या केल्या नव्हत्या. चोरीचा पेशा पत्करल्यापासून गेल्या पांचएक वर्षात नाहीतरी पंचवीसएक चोऱ्या त्याने बिनबोभाट केल्या होत्या; आणि त्या बेमालूमपणे पचविल्याही होत्या. एकेक लहानसहान चोरी पचत गेली तसतशी त्याची हिंमत वाढत गेली व तो अधिकाधिक धाडसाने मोठाल्या चोऱ्या शिताफीने करू लागला. परंतु आपल्या आयुष्याला कलाटणी देणारी, वेगळाच अनुभव आणून देणारी त्या दिवसासारखी (म्हणजे रात्रीसारखी म्हणा) अजब चोरी आपल्या हातून घडेल याची कल्पना मात्र त्याला कधी स्वप्नातही शिवली नव्हती. ती चोरी त्याने ठरवून केलेली नव्हती. तर त्याच्या हातून खरोखरीच अभावितपणे घडली होती. आणि म्हणूनच की काय, तो या वेळी बेमालूमपणे गोत्यात आला होता—कधी नाही तो बेसावधपणे पकडला गेला होता. पण प्रत्यक्ष पकडला जाऊनही त्या गोष्टीची त्याला बिलकुल खंत वाटली नाही. उलट, धन्यतेने तो बेहोष झाला होता. आणि त्या अजब चोरीबद्दल त्याला मिळणारे ते बक्षीस—

घडले होते ते असे—

नेहमीप्रमाणे चोरीची पूर्वतयारी यावेळीही दादूने सावधपणे केली होती. त्याच्या उपजत बुद्धीने त्याला आजवर कधीही दगा दिलेला नव्हता. पुण्यातल्या कर्वे रस्त्यावरील, दूरवरचा, आडवाटेवरला एक एकांडा निवांत बंगला या वेळी त्याच्या चोरीचे लक्ष्य होते. मालक मालकिणीसह बाहेरगावी गेलेला आहे असा नामी दिवस त्याने हेरला होता. बंगल्याचा राखणदार माळी बाहेर ओटचावर झोपायचा. म्हणजे पाठीमागल्या बाजूने बिनबोभाट कार्य साधण्यासारखे होते.

मध्यरात्र नुकतीच उलटलेली. रात्र तशी चांदणी, पण आभाळ ढगाळलेले. त्यामुळे उजेड अंधुकसाच. बंगल्याच्या ओटचावर अपेक्षेप्रमाणे माळी घोरत पडलेला. त्याचा कानोसा घेऊन दादू बंगल्याच्या पाठीमागे वळला. तिथली बाग रातराणी, पारिजातक अशा फुलांच्या सुवासाने दरवळली होती. रातराणीच्या सुगंधाने त्याचे मन विशेष भरून गेले. दबकत दबकत एकेक पाऊल टाकीत दादू पुढे सरसावत होता. तोच त्याला एक खिडकी चक्क उघडी दिसली. म्हणजे माळी खिडकी बंद करायला विसरलेला दिसतो. आपले सुदैवच म्हणायचे. गिरमीट वगैरे न वापरता आत प्रवेश मिळविणे सोपे होते. त्या खिडकीला बारीकशा पातळ लोखंडी कांबींची—ग्रिलची चौकट बसविली होती. पण ती केवळ शोभेचीच—तकलुपी. मधल्या मोठाल्या चौकोनाची एक पट्टी जराशी वाकवली की सहज आत शिरता येणार होते. दादूने खिडकीतून आत नजर

टाकून कानोसा घेतला. सर्वत्र सामसूम होते. मग तो हळूच खिडकीशी झटला, आणि गुपचूप आपल्या कामगिरीला लागला.

ही कामगिरी बजावता बजावता वाऱ्याची एक मंद झुळूक आली, आणि वाजूच्या रातराणीच्या फुलांचा मादक सुगंध दादूच्या नाकात भरला. त्याचे मन उल्हसित झाले. उत्साह दुणावला. सुगंधाच्या त्या धुंदीतच तो खिडकीवाटे आत उतरला. आणि तेवढ्यातच एक चमत्कार घडला.

दादू खिडकीतून अलगद आत उतरायला, आणि चंद्रावरचे ढगाचे आवरण दूर होऊन चांदण्याचा झोत खिडकीतून आत पडायला एकच गांठ पडली. त्याबरोबर दादू चपापला. चमकून आजुबाजूला पाहू लागला. तर, खिडकीशीच एका डौलदार पलंगावर, भपकेबाज बिछान्यावर एक अत्यंत सुंदर तरुणी शांत उताणी झोपलेली. धवलशुभ्र तलम सांडी ल्यालेल्या त्या तरुणीचा चेहराच तेवढा खिडकीसमोर असल्याने, चांदण्यांच्या अमृत-धारांच्या सिंचनाने तो पुलकित झाला होता. मूळच्याच सौंदर्याला एक प्रकारचे स्वर्गीय तेज लाभले होते. ते लावण्य पाहून दादू दिपून गेला– भारला गेला. काही क्षण जागच्या जागी खिळून राहिला. रातराणीच्या सुगंधाची धुंदी अजून त्याच्या डोक्यातून उतरली नव्हती. तोच हे स्वर्गीय दृश्य डोळ्यांसमोर ठाकलेले !....

एखाद्या अप्सरेच्या महालात तर आपण शिरलो नाही ना ? अशा संभ्रमात तो क्षणभर पडला. कारण, एवढा रमणीय चेहरा त्याने जन्मात कधी पाहिलेला नव्हता. पोवळ्यासारखे ओठ असलेले ते लोभसवाणे, गोरेपान, मनोवेधक रूप पाहून त्याला बाहेरच्या बागेतल्या पारिजातकाच्या फुलाची आठवण झाली. तिच्या सुंदर केसांवरही चांदण्याचा रुपेरी तजेला चढला होता. अंगावर, छाती-पासून खाली, पोपटी तलम चादर पांघरलेली दिसत होती.

दादूचे लक्ष अर्थातच तिच्या आकर्षक चेहऱ्याकडे लागून राहिले होते. धुंदीतच तो हळूच पुढे सरकला. त्या लावण्यवतीला आपली चाहूल लागू न देता तो शक्य तितका पलंगाच्या सन्निध गेला, आणि वाकून अधिऱ्या, धुंद नजरेने तिचे मुखकमल अगदी जवळून न्याहाळू लागला. तिच्या उशाशी सुवासिक फुलांची वेणी पडलेली होती. आधीच्याच धुंद मनस्थितीत त्या सुगंधाची भर पडून तो अगदी बेचैन झाला. तिच्या मोहक ओठांचे चुंबन घेण्याचा मोह त्याला अनावर झाला. आपली चाहूल लागून तिला जाग येण्यापूर्वी तिचे चुंबन घ्यावे, आणि चोरीचा बेत आजच्यापुरता सोडून देऊन खिडकीतून चपळाईने पसार व्हावे असा विचार त्याच्या मनात विजेसारखा चमकून गेला.

–आणि तेवढ्यातच ती तरुणी झोपेतल्या झोपेत खुदकन् हसली. आता मात्र त्याला मुळीच राहवेना. आपली उत्कट इच्छा पुरी करायची तर विलंब लावणे श्रेयस्कर नव्हते. दादूने अधीरतेने, आपल्या दोन्ही हातांनी चटकन् तिचे दोन्ही दंड घट्ट धरले, आणि तिला कशाचा काही बोध होण्याच्या आधीच, तिच्या लोभसवाण्या ओठांवर आपले आतुर ओठ टेकवून तिचे दीर्घ चुंबन घेतले.

फुलांच्या सुगंधाने आधीच धुंद झालेला दादू त्या रमणीचे चुंबन घेताच मारे बेहोष झाला. आपल्याच तंद्रीत बेभानपणे डोळे मिटून जागच्या जागी सुस्त उभा राहिला.

दादूने तिचे दंड धरले त्यावेळीच अर्थातच ती तरुणी खडबडून जागी झाली होती. पण दादूने घट्ट धरून ठेवल्याने ती असहाय्य-पणे पडून राहिली होती. त्याची चुंबनक्रिया पुरी होताच तिच्या-वरील त्याची पकड सुटली. त्याबरोबर ती घाबऱ्याघुबऱ्या धडपडून उठली. तेवढ्यात चंद्र पुन्हा ढगाआड गेल्याने सगळीकडे अंधार झाला. भयभीत झालेली ती तरुणी अंधारातच बाजूच्या खोलीकडे पळाली. ती ओरडली मात्र नाही. बहुधा, भयभीत झाल्याने तिची वाचाच बसली असावी. ती पलीकडल्या खोलीत गेल्यानंतर मात्र एकच आरडाओरडा सुरू झाला. पण भान हरपलेल्या दादूच्या कानात मात्र काहीच शिरलेले दिसले नाही.

क्षणभरातच घरातली मोलकरीण आणि ओटचावर झोपलेला माळी ही दोघे धावत पळत आत आली. माळ्याने विजेचे बटण दाबून दिवा लावला आणि झडप घालून दादूला पाठीमागून घट्ट आवळून धरले. लगेच मोलकरणीने एक रस्सी आणून ती दादूच्या भोवती सरासर गुंडाळली. मग तिने व माळ्याने मिळून दादूला चांगले बांधून टाकले. मुखस्तंभासारखा जागच्या जागी सुस्त उभा असलेला दादू आता मात्र बराचसा भानावर आला. आपण बेमालूम पकडलो गेलो याची जाणीव आता कुठे त्याला झाली. तरीपण तो बावरलेला दिसला नाही. ती मोहमयी रमणी कुठे दिसते का म्हणून तो शोधक नजरेने पहात होता. त्याच्या चेहऱ्यावर नि नजरेत तृप्तीचे समाधान विलसत होते.

दादूला करकचून बांधल्यावर माळ्याने त्याला ढकलून एका खुर्चीत बसवले, आणि उरलेल्या रस्सीने त्या खुर्चीशी त्याला जखडून टाकले.

मोलकरीण परत आत गेली. तेवढ्यात कुणीतरी फोन करून पोलीसाना बोलावले.

पोलीस येताच दादूला त्यांच्या स्वाधीन करण्यात आले. पोली-सांच्या तावडीत दादू आज प्रथमच सांपडला होता,– तोही वेग-ळ्याच कारणासाठी. परंतु पोलिसांबरोबर जातानाही त्याची फारशी चलबिचल झालेली दिसली नाही. ती लावण्यवती दिसते का–म्हणून आपली एक वेळ त्याने घरात दृष्टी फेकली. पण पुन्हा काही तिचे दर्शन त्याला लाभले नाही.

दोन पोलीस दादूला बाहेर ओटचावर घेऊन गेले. पण सब-इन्स्पेक्टर मागे राहिला. त्याने सगळी हकीगत विचारून घेतली. लोखंडी कांब वाकवलेली खिडकी नि शेजारचा पलंग त्याने पाहून घेतला.

★★

दादूवर रीतसर खटला सुरू झाला. त्याने आपल्या बाजूने वकी-लच दिला नव्हता. आपली बाजू मुळी तोच स्वतः मांडणार होता.

कोर्टात त्या स्वरूपसुंदर ललनेचे दर्शन पुन्हा घडेल अशी आशा दादूला वाटत होती. पण सुरुवातीला तरी त्याची अपेक्षा फोल

ठरली. त्या बंगल्याच्या फिर्यादी मालकाशेजारी त्याच्या पत्नीच्या बाजूला बसलेली स्त्री बहुधा तीच असावी असा त्याने तर्क केला. पण माथ्यावरचा पदर तिने घुंघटासारखा पुढे ओढून घेतला होता. त्यामुळे ढगाआड गेलेल्या चंद्रासारखा तिचा मुखचंद्र साडीच्या पदराआड लपलेला होता. त्या धुंद रात्री घेतलेल्या तिच्या चुंबनाच्या आस्वादाची माधुरी दादूच्या ओठावर अजून रेंगाळत असावी. कारण, अद्यापही तो काहीसा त्याच धुंदीत असल्यासारखा दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावरील तृप्तीचे तेज अजून पूर्णपणे विरले नव्हते.

फिर्यादी पक्षाची बाजू मांडून झाल्यावर त्या माळयाची व मोलकरणीची साक्ष झाली. मग, दादू जबानीसाठी आरोपीच्या पिंजऱ्यात उभा राहिला. घुंघटवाल्या त्या स्त्रीकडे एकटक नजर लावून तो संथपणे बोलू लागला—

"...चोरीचा बेत योजून मी त्या बंगल्यात शिरलो होतो. पण पैशाची किंवा कसल्याही मालमत्तेची चोरी करण्याचा माझा बेत कुठल्या कुठं विरला तो या — या स्त्रीच्या दर्शनानं"—आणि त्या घुंघटवाल्या स्त्रीकडे बोट दाखवीत तो पुढे म्हणाला— "एवढी खुबसुरत तरुणी मी जन्मात कधी कुठं पाहिली नव्हती."

त्याचे हे उद्‌गार ऐकताच न्यायाधीशांसह कोर्टातील एकजात सर्वांची नजर त्या स्त्रीकडे वळली. त्या स्त्रीने तर घुंघट असूनही लज्जेने खाली मान घातली होती.

दादू पुढे सांगू लागला—

"न्यायाधीश महाराज, मला गुन्हा नाकबूल करायचा नाही. उलट, माझा गुन्हा मी दिलखुलासपणं कबूल करणार आहे. आधीच रातराणीने सुगंधित झालेलं ते मस्त वातावरण, आणि त्यात चांदण्यानं जास्तच खुललेला या तरुणीचा अत्यंत देखणा चेहरा ! मी अगदी भारला गेलो. मला मोह आवरेनासा झाला; आणि मी तिचं चुंबन घेतलं."

दादूने अशा प्रकारे खुल्लंखुल्ला कबुलीजबाब देताच त्या घुंघटवाल्या स्त्रीची अवस्था अत्यंत केविलवाणी झाली. कोर्टात तर एकच खळबळ उडाली. सर्वांच्या नजरा आपल्याकडे लागलेल्या असतील याची कल्पना तिला होतीच. शरमेने तिने तोंड आणखी पदरात लपविले. तिथून तडक निघून जावे असाही विचार तिच्या मनात डोकावला. पण कोर्टाचे काम — आणि त्यात आपलीच फिर्यादीची बाजू. आपल्यालाही कोर्टापुढे उभे रहावे लागेल. नाइलाजाने तिला जागच्या जागी चुळबुळत बसावे लागले.



दादू पुढे बोलतच होता—

"न्यायाधीश महाराज, मला या गुन्ह्याबद्दल जास्त शिक्षा होईल याची मला कल्पना आहे. तरीसुद्धा तो मी सरळ कबूल करतोय्. मी चोरी केली ती चुंबनाची. मात्र एवढंच सांगतो, की... या गुन्ह्याबद्दल मला बिलकुल पश्चात्ताप होत नाही. उलट, जीवनातला एक अनोखा आनंद प्रथमच अनुभवायला मिळाला म्हणून मी संतुष्ट आहे. एवढंच नव्हे, तर या विलक्षण अनुभवानं माझ्या मनावर एवढा गाढ परिणाम घडविला आहे की, यापुढं चोरीसारखं हीन कामं न करण्याचा मी निश्चय केला आहे. चोरीच्या फंदात पडल्यानं लग्न करण्याचं मी आजवर टाळीत आलो होतो. पण आता ही शिक्षा भोगून आलो म्हणजे मी उजळ माथ्यानं रोजगारधंदा करणार आहे, आणि— आणि लग्न पण. बस्स !... मला याहून जास्त काही सांगायचं नाही."

दादूची ही जबानी ऐकून न्यायाधीशांप्रमाणेच कोर्टातले सारे लोक थक्क झाले. तटस्थ होऊन पहातच राहिले.

आपल्याला किती शिक्षा होते एवढेच दादूला आता ऐकायचे होते. चोरीबद्दल केवढी शिक्षा होते याची सर्वसाधारण माहिती त्याला होती. पण यावेळच्या चोरीच्या अकल्पित प्रकाराबद्दल किती शिक्षा होईल याची त्याला नीटशी कल्पना नव्हती. मात्र होईल ती शिक्षा भोगण्यास तो आनंदाने तयार होता. स्वर्गतुल्य अनुभवाचे मोल द्यायलाच हवे होते.

इकडे फिर्यादीच्या वकिलाने फिर्यादी घरमालकाशी काहीतरी गुफ्तगू केले. लगेच घरमालकाने आपला पत्नीशी नि त्या घुंघटवाल्या स्त्रीशी काहीतरी कानगोष्ट केली आणि वकिलाच्या कानात हळूच काहीसे सांगितले. मग, वकील महाशयांनी त्या घुंघटवाल्या स्त्रीला, घुंघट बाजूला सारायला लावून कोर्टापुढे उभे केले, आणि बोलायला सुरुवात केली—

"न्यायाधीश महाराज, कसाही कां केलेला असेना, आरोपीनं आपला गुन्हा सरळ कबूल केला आहे. जिचं चुंबन घेतल्याचं त्यानं सांगितलं ती ही ललिता— फिर्यादीची मुलगी."

ललिता मान खाली घालून उभी होती. आपले हात तिने पदरात गुरफटवून पोटाशी धरले होते. घुंघट नव्हते तरी तिने माथ्यावरून पदर घेतलेला होता. दादू तिच्याकडे एकटक पहात राहिला.

न्यायाधीशांनी आरोपीला विचारले— "जिचं चुंबन घेतलं ती हीच मुलगी का ?"

दादू अनिमिष नेत्रांनी तिच्या चेहऱ्याकडे पहात खुषीने उत्तरला— "हो— ही— हीच ती."

न्यायाधीशांनी ललितेला प्रश्न केला— "यानंच तुमचं चुंबन घेतलं ना ?"









ललितेने होकारार्थी नुस्ती मान हालविली. तेव्हा न्यायाधीश म्हणाले—"मान हालवून नाही चालणार. 'हो' किंवा 'नाही' ते स्पष्ट बोला."

त्यावरोबर वकीलमहाशयांनी मध्ये पडून खुलासा केला– "महाराज, तिला वोलता येत नाही. मुकी आहे ती. काही वर्षांपूर्वी रेल्वेच्या अपघातात सांपडून हिच्या दोन्ही हातांचे पंजे तुटले, आणि शॉक्– मानसिक धक्का वसून हिची वाचा गेली. तेव्हापासून हिचे डोळे तिरळे होऊन केसही पांढरे झाले आहेत."

"वऽरं— वऽरं ! राहू द्या !" सहानुभूतीने न्यायाधीश गडबडीने बोलले.

तिकडे दादूच्या अंगावर सर्रकन् काटा उभा राहिला. तेवढ्यात वकीलमहाशय म्हणाले—

"न्यायाधीश महाराज, आरोपीनं गुन्हा कबूल केलेलाच आहे. यापुढे चोरीचा धंदा सोडून रोजगार धंदा करायचा निश्चयही त्यानं कोर्टासमक्ष आत्ताच बोलून दाखवला आहे. आता माझ्या अशीलाचं – फिर्यादीचं म्हणणं असं आहे, की – आरोपीनं एवीतेवी ललितेचं चुंबन घेतलंच आहे. तिच्यावर तो मोहित झालेला आहे. तर हिच्याशी लग्न करायला आरोपी तयार आहे काय ? तयार असेल तर हा खटला काढून घेण्यात येईल. एवढंच नव्हे, तर आरोपीला नोकरी मिळवून देण्याची व्यवस्थाही माझा अशील करील."

खटल्याला ही अचानक वेगळीच कलाटणी मिळालेली पाहून न्यायाधीशांसह कोर्टातील सारेजण चकित झाले; ललितेकडे व दादूकडे आलटून पालटून पाहू लागले. ललितेने लज्जेने मान आणखीनच खाली घातली होती व माथ्यावरचा पदर थोडा तोंडावर ओढून घेतला होता.

ज्या लावण्यवतीचे आपण धाडसाने चुंबन घेतले – अपूर्व असा अनुभव घेतला, ती तरुणी मुकी, तिरळी आहे; एवढेच नव्हे, तर तिचे दोन्ही पंजे तुटले असून केस पिकले आहेत हे ऐकताक्षणीच दादू अवाक् झाला होता. त्यात आणखी तिच्याशी आपण लग्न करण्याबद्दलचा हा नवाच अनपेक्षित पवित्रा फिर्यादी पक्षाने टाकलेला पाहून तो स्तिमितच झाला, किंचित् काल त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. कोर्टात कुजबूज सुरू झाली. वकिलाच्या सूचनेवरून ललिता पुन्हा आपल्या जागी जाऊन घुंघट घेऊन बसली.

"आरोपीला हे कबूल आहे काय ?"– न्यायाधीशांनी दादूला सरळ सवाल टाकला. सर्वांचे डोळे व कान त्याच्याकडे लागले. दादूला आता उत्तर देणे भागच होते. पुन्हा एकदा दादूच्या अंगावर कांटा उभा राहिला आणि त्याचे सारे अंग शहारून गेले. भानावर येऊन शेवटी तो खाली मान घालून चांचरत म्हणाला– "अं—अं—ही— हिच्याशी लग्न ?–छे–छे !. . त्यापेक्षा मला काय द्यायची ती शिक्षा द्या. माझ्या मनात सांठवलेल्या त्या मधुर अनुभवाच्या भरावर मी ती शिक्षा आनंदानं भोगीन."

कोर्टात पुन्हा कुजबूज सुरू झाली.

ज्यूरींनी आपसात विचारविनिमय केला; आणि त्यांच्या सल्ल्याने न्यायाधीशांनी शेवटी दादूला दोन वर्षांच्या तुरुंगवासाची शिक्षा सुनावली.

दादूने शांतपणे शिक्षा ऐकून घेतली. ललितेकडे पुन्हा एकवार दृष्टिक्षेप टाकल्याशिवाय मात्र त्याच्याने राहवेना. तिच्याकडे एक चोरटा कटाक्ष टाकून त्याने आपली मान खाली झुकवली. झालेली शिक्षा त्याने जणु काय शिरसावंद्य मानून स्वीकारली होती.

●●●















दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तके पाठविताना नेहमी २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणे सोईचे होते. १ प्रत असल्यास नुसती पोच दिली जाते.

—संपादक

**अशा झुंजा ! असे झुंजार ● रुक्मिणी**

### शैलीदारपणे लिहिलेला भारतीय क्रिकेटचा अर्धशतकाचा इतिहास म्हणजेच

### अशा झुंजा ! असे झुंजार !

**प्रा.** ना. सी. फडके यांनी लिहिलेले क्रिकेटविषयक पुस्तक अलीकडेच मी वाचले. पुस्तक संपले तरी त्यातल्या अवीट आठवणींची धुंदी अन् सुखद् स्मृतींची मोहिनी माझ्या मनावर चढली ती काही अजून उतरली नाही. क्रीडाविषय रंगविण्यात फडक्यांचा कसा हातखंडा आहे त्याचा पुनः प्रत्यय त्यांच्या **'अशा झुंजा ! असे झुंजार !'** या ग्रंथात पहावयास मिळाला. नुसता वाचण्यासारखाच नव्हे तर विकत घेऊन वाचावा इतका तो ग्रंथ सुंदर आहे. खुर्चीवर बसल्या बसल्या, भारतीय क्रिकेटचे गेल्या पन्नास वर्षांचे दर्शन फडक्यानी जणु टेलिव्हिजनप्रमाणे घडविले आहे. क्रिकेट सामने पहाण्यास झुंडी लोटतात, हे खरे. पण त्याचा इतिहास वाचणारे वाचक अगदी बोटावर मोजण्याएवढे. पण इतिहासासारखा रुक्ष विषय फडक्यानी इतक्या कल्पकतेने अन् खुमासदारपणे सांगितला आहे कीं स्टेडियमवर बसून आपण जणु क्रिकेट सामने पहात आहोत असाच भास होतो. जे सामने त्यांनी पाहिले, जे पराक्रम त्यांनी चक्षुर्वैसत्यं बघितले त्याचे किस्से त्यांनी अतिशय मनोरंजकपणे सांगितले आहेत.

शाळेत असताना फडक्यांनी चौरंगी सामन्याविषयी लिहिलेला अन् हॉकीपटु ध्यानचंदचे वर्णन करणारा लेख मी मोठ्या आवडीने पुनः पुन्हा वाचीत असे. त्यावेळी त्यानी दुलिपसिंहाचे केलेले वर्णन अप्रतिम होते. 'धावा काढावयाच्या वेळी ते सशाच्या वेगाने धावत असत. पण ज्यावेळी टोला लांब गेला असेल व एकच धाव काढावयाची असेल त्यावेळी दिवाणखान्यात चालावे अशा सावकाशीने आणि रमत गमत चालत ते एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत जात' असे वर्णन त्यांनी दुलीपसिहजींच्या खेळाचे केले तर ध्यानचंदविषयी त्यांनी लिहिले : 'आपल्या कालिदासाचे शाकुंतल जर्मन कवि गटे हा डोक्यावर घेऊन नाचल्याचे ऐकून आपणास जो आनंद होतो तोच ध्यानचंदला तिकडले खेळाडू डोक्यावर घेऊन नाचले हे ऐकून आपल्याला झाला पाहिजे.' तेव्हा तर कुस्तीतहि फडक्यांना रस होता. १९२८ साली गामा-झीस्कोची कुस्ती पतियाळा येथे झाली अन् त्यात गामा विजयी झाला. त्या कुस्तीविषयी मार्मिक लेख टोपण नांवाने त्यानी 'रत्नाकर' मासिकात लिहिला होता. एकूण काय तर क्रिकेटप्रमाणेच हॉकी अन् कुस्तीतहि आमचे फडके तरुणपणी रंगून जात.

प्रस्तुत पुस्तक वाचताना फडक्यांच्या क्रीडा-लेखनाच्या वरील स्मृति माझ्या मनात तरळत होत्या अन् त्या धुंदीतच त्यांचे हे नवे पुस्तक मी एका सपाट्यात वाचून काढले. बावीस प्रकरणात अत्यन्त चटकदारपणे त्यांनी भारतीय क्रिकेटच्या पन्नास वर्षांच्या मनोरंजक आठवणी सांगितलेल्या असून त्यात कॉलेजच्या शील्ड सामन्यांपासून ते कसोटी सामन्यांपर्यंतचे सारे किस्से त्यांनी खुसखुशीतपणे सांगितले आहेत. शेवटचे समारोपाचे प्रकरण त्यांच्या क्रीडाविषयाच्या विशेषत: क्रिकेटच्या भवितव्यतेची चाहूल देण्यास पुरेसे उतरले आहे. वाचा आता त्या पुस्तकातल्या अविस्मरणीय गंमती जंमती अन् न पुसणाऱ्या आठवणी.

सध्याचे प्रो. देवधर शाळेत असताना यष्टिरक्षण करीत. एकदा चेंडूने त्यांचे दात उडवले. तेव्हा त्यांच्या मावशीनी जरबेने हुकूम सोडला, 'उद्यापासून क्रिकेट बंद' पण अखेरीस विकेटकीपिंगचे काम न करण्याचा हवाला देण्यात आल्यावर त्यांना क्रिकेट खेळण्यास परवानगी मिळाली. किर्लोस्कर मासिकाचे भूतपूर्व संपादक शंकरराव किर्लोस्कर हे पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून खेळत अन् ते अगदी टोलेबाज फलंदाज होते ही गोष्टहि लक्षात ठेवण्यासारखी आहे. अबू जोशी नांवाचा फर्ग्युसनचा एक खेळाडू होता. बॅटींग - बोलींगमध्ये हा कच्चाच. पण क्षेत्ररक्षणात त्याचा हातखंडा होता. तरी देखील याने एकदा झेल सोडलाच. तेव्हा दुसऱ्या वाय्. जी. जोशी गोलंदाजाने त्याला म्हटले, 'हे रे काय अबू ?' 'एक अशी झकास मुलगी रस्त्यानं चालली होती, कीं तिच्याकडे बघण्याच्या नादात झेल सुटला रे ! चटक फटक पोशाख करणाऱ्या या पोरी फार वाईट' अबूने जवाब दिला. त्या काळीहि काही रंगेल खेळाडू असतच याची साक्ष वरील आठवणीत पहावयास मिळते. १९१६ साली चौरंगी सामन्यात देवधरांनी






अनुक्रमणिका

युरोपियनांविरुद्ध प्रत्येक डावात ५२ नि ७३ धावा करण्याचा पराक्रम केला तेव्हा सुप्रसिद्ध नाटककार राम गणेश गडकरी यांच्या हस्ते त्यांना चांदीचा पेला देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. गडकऱ्यांना क्रिकेटचा भारी नाद होता. फडक्यां-सारखा म्हणाना. पालवणकर बंधूंच्या आठवणी चटकदार आहेत. पण 'पी विठ्ठल पुढे हिंदु संघाचे कॅप्टनहि झाले. इंग्लंडच्या दौऱ्यावर भारतीय संघातून ते गेले, तेव्हां तिकडेहि त्यांनी बहादुरी गाजविली.' या आठवणीत गफलत आहे. विठ्ठल हिंदु संघाचे कप्तान झाले खरे पण ते भारतीय संघाबरोबर विलायतेला गेले नाहीत. ही चूक अनवधानाने झालेली दिसते. १९२६ साली हिंदु संघाने युरो-पियन संघाचा चौरंगी सामन्यात पराभव केला. हौलेट नांवाचा तुफान गोलंदाज त्यावेळी युरोपियन संघात होता त्यावेळी नाटक मंडळयातल्या नटाना क्रिकेटचा षौक असायचा. मामा वरेरकरांनाहि क्रिकेट आवडायचे. या सामन्यानंतर कुणी-तरी मामाना म्हटले, "मामा, हा हौलेट किती यार्डाचा स्टार्ट घेतो, माहीत आहे का ? वीस यार्डांचा ! आहात कुठे ?" मामा लागलीच बोलले, "अरे, वीस यार्ड म्हणजे काहीच नाही, मागे प्रेसिडेन्सी सामन्याच्या वेळेस चीथॅम नांवाचा गोरा लालबुंद साहेब होता. तो चेंडूफेक करण्या-साठी तीस यार्डांचा स्टार्ट घ्यायचा !" मामांच्या थापेला उत्तर देताना देवभक्त बोलले, "अहो मामा कसला चीथॅम घेऊन बसलात ? कोणत्याशा सामन्यात कोण-तासा बोलर मी पाहिला. त्याचा स्टार्ट एवढा मोटा की, तो पावलं मोजीत जो गेला आहे, तो अजूनपर्यंत परत आलेला नाही !" मामांच्या थापेला ही सवाई थाप देवभक्तांनी कशी दिली त्याची आठवण फडक्यांनी आपल्या ढंगदार भाषेत आठव्या प्रकरणात सांगितली आहे.

१९२६ साली एम्. सी. सी. विरुद्ध सी. के. नायडूंनी अकरा षट्कार मारून १०० मिनिटांत १५३ धावा कशा काढल्या त्याचे फडकेकृत वर्णन मुळातच वाचावे. दुलीपसिंहाचे वर्णन वाचताना फडक्यांची मोहक लेखणी अधिकच खुलली आहे. दुलीपचे अन् आपले नाते आहे असे सांगितल्यावर रणजीना हॉटेलमध्ये जागा कशी मिळाली त्याची आठवणहि मनोरंजक आहे. क्रिकेटपौकीन बाबू टांगेवाल्याची आठवणहि मनाला मोठी सुखविणारी आहे. जार्डिन संघाविरुद्ध अधिकृत कसोटी सामन्यात १९३४ साली अमरनाथने मुंबईला शतक फडकविले त्याचे वर्णन वाचताना अमरनाथ माझ्या डोळ्यांसमोर खरोखरी उभा राहिला. कारण याचे ते शतक पहाण्याची संधी मला लाभली होती. देवधरांना कसोटी सामन्यात खेळण्याची संधी कशी व कां लाभली नाही त्याची कारणे सांगून फडके म्हणतात— 'त्यांना डावलून ज्यांची वर्णी लागली होती ती वशिल्याची तट्टं भराभर निकामी झाली...... देवधर मात्र नंतर थोडी थोडकी नव्हे तर पंधरा वर्षे नुसते खेळतच












राहिले नाहीत तर रेकॉर्डस मोडीत राहिले आणि महाराष्ट्र असोसिएशनच्या एकाहून एक, मोठ्या पराक्रमाचे शिल्पकार ठरले.' देवधरांवर झालेल्या अन्यायावर फडक्यांनी निष्ठूरपणे लिहिले ते सारे खरे आहे, सत्य आहे.

जातीय सामने बंद कसे करण्यात आले त्याविषयीहि फडक्यानी परखडपणे लिहिले आहे. 'ज्या महात्मा गांधींना उजवी पॅड कोणती आणि डावी कोणती हे सांगतां आलं नसतं त्यांचा जातीय सामन्याविरुद्ध आदेश मिळविण्यात आला' असा टोला त्यांनी महात्माजींना दिला आहे तो यथातथ्य म्हणावा लागेल. बॉबी तल्यारखानचे व्यक्तिचित्र बहारीचे आहे. विद्यमान कॉमेंटेटर्सबद्दल गौरवपर लिहून फडके म्हणतात — 'मात्र या सगळ्या गोष्टी जमेला धरूनहि मला असंच म्हणावंसं वाटतं की तल्यारखान यांच्या तोडीचा निवेदक आता पुन्हा होणार नाही ! तल्यारखान ते तल्यारखान !' त्यांच्या या विधानाशी भारतातला कुठलाहि क्रिकेट शौकिन आनंदाने सहमत होईल यात काय संशय ? रणजी करंडक सामन्यातले मर्चंट-हजारे विक्रम, भाऊसाहेब निंबाळकरांची ब्रॅडमनचा विक्रम हुकल्याची संधी, १९४६ साली विलायत दौऱ्याच्या वेळी कप्तानपदाबाबत विजय मर्चंट ह्यांच्यावर झालेला अन्याय, मर्चंट यांच्यावर वाहिलेली आदरांजली, १९४७ साली ब्रॅडमनने भारतीय संघाविरुद्ध मारलेली धावांची घोडदौड, आणि १९४८ साली वेस्ट इंडिज संघाविरुद्ध मुंबईस पांचव्या टेस्ट सामन्यात दत्तू फडकरने केलेला पराक्रम वगैरे आठवणी वाचताना मन अगदी रंगून जाते. कॉमनवेल्थ संघाचे दौरे, वॉरेलचा पराक्रम, विजय मर्चंट ह्यांचा खेळाडूपणा १९५२ साली विलायतेत लॉर्डसवर मनकडने केलेला पराक्रम, ऑस्ट्रेलियन संघाचे दौरे, १९५९ साली दिल्लीला वेस्ट इंडिजविरुद्ध चंदू बोर्डेचे कसोटी सामन्यात दोन्ही डावात शतक करण्याचे विरलेले स्वप्न, त्याच साली कसोटी सामन्यात विलायतेत भारतीय संघाचा उडालेला फजितवाडा अन् जसू पटेलने कानपूरला ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध केलेली करामत वगैरे आठवणी एखाद्या चित्रपटातल्या दृष्यांप्रमाणे हारीने अन् अनुसंधान न सोडता कुशलपणे मांडण्यात फडके कमालीचे यशस्वी झाले आहेत. गोष्टी खटकल्या दोनच. क्रिकेट विषयाच्या या अप्रतिम ग्रंथात छायाचित्रांचा दुष्काळ हे या ग्रंथाला लागलेले मोठेच गालबोट होय. पण ती बाब प्रकाशकांच्या अखत्यारातील म्हणून सोडून देऊ. पण विजय मर्चंट यांच्या इंग्रजी प्रस्तावनेचा माठी तर्जुमा न देण्याचा दोष कुणाच्या पदरी बांधावा ते सांगणे कठीण आहे.

फडक्यांच्या एका क्रिकेटविषयक इंग्रजी पुस्तकाबद्दल सी. के. नायडूनी म्हटले— 'प्रोफेसर फडके म्हणजे आमचे भारताचे नेव्हिल कार्डस् आहेत.' प्रस्तुत पुस्तक वाचल्यानंतर नायडूंचा अभिप्राय मला शंभर टक्के पटला. कार्डस्चे क्रिकेटविषयक (इंग्रजी) ग्रंथ वाचून जसा अपूर्व आनंद लाभतो तसेच समाधान, तसेच आगळे सौख्य, फडक्यांचे हे पुस्तक वाचून मला लाभले असे मी निःसंकोचपणे म्हणू शकतो. अन् म्हणूनच क्रिकेटप्रेमिकांना पुन्हा सांगतो की हा ग्रंथ विकत घेऊन वाचण्याच्या योग्यतेचा आहे.

**—अरविंद ताटके**

**[अशा झुंजा ! असे झुंजार ! लेखक: ना. सी. फडके. व्हीनस प्रकाशन, पुणे २. पृष्ठे १८० किंमत रु. सहा].**

## मानवी स्वभावाचे प्रत्ययकारी दर्शन

**मानवी** जीवन दुःखाने भरलेले आहे. सामान्यतः प्रत्येक माणूस हा पोळलेला आहे. सुखापासून वंचित आहे. आणि अनेकदा परिस्थितीच अशी विचित्र असते की, ह्या दुःखास जबावदार कोण हे सांगता येत नाही. 'हे असे कां' ह्या प्रश्नास उत्तर नाही. पिकल्या पानाप्रमाणे प्रवाहात वाहात जायचं, येवढंच अनेकांच्या वाटयाला येतं. 'गहिवर', एदीन' व 'आश्रम' हे कथासंग्रह लिहिणाऱ्या जयवन्त दळवींच्या '**रुक्मिणी**'त अशीच अनेक वंचित माणसे आपल्याला दिसतात. मुंबई, मालवण, अमेरिका आदि निरनिराळ्या ठिकाणचे, निरनिराळ्या सामाजिक स्थराची व विभिन्न परिस्थितीत वाढलेली !

अत्यंत सुंदर असलेल्या परंतु विठुलरावांसारख्या कुरुप माणसाबरोबर रहावे लागणाऱ्या वेड्या '**रुक्मिणी**'चं दुःख वेगळे आहे, तर अतिरिक्त वासनेमुळे

अतृप्त राहिलेल्या 'मुक्ता'चं दुःख निराळं आहे ! वन्याच्या मृत्यूबद्दल शोक व्यक्त करण्यासहि चोरी असलेल्या वयस्क प्रेमिकेचं दुःख आणि संन्यासी वासूकाकावर मूक प्रेम करणाऱ्या 'अबोल' सोवळ्या भटीणबायचं दुःख विचित्र आहे. कुरूपतेमुळे लग्न न होणारी 'मोहिनी' आणि विवाहित जीवनात 'जन्मठेपी'ची सजा भोगत असणाऱ्या बाईसाहेब ह्याही दुःखीच.

या संग्रहात केवळ स्त्रियाच नाहीत. काही पुरुष व कापुरुष देखील यात आहेत. त्यांचीहि दुःखे विचित्र; अजब ! मुका, बहिरा व दुबळा शंभू हा वासनेची पूर्ति होऊ न शकलेला जीव आणि 'समथिंग इज रॉंग' असलेला बेसुमार सुंदर परंतु कापुरुष 'विहारी' हे दोघेहि दुःखीच ! श्रीवास्तवची पत्नी म्हणूनच जगू इच्छिणाऱ्या विधवा 'एल्सी'च्या वासनेची पूर्ति करण्याचे एक साधन म्हणून राबायचे की नाही ह्याचा संभ्रम पडलेला प्रेमिक यात आहे तर अवखळ आयुष्य सोडून मार्गावर येऊ पहाणारा परंतु अचानक कारखान्यात झालेल्या 'स्फोटा'त लुळा झालेला रंगाहि त्यात आहे. अवंतिकेकडून फसविला गेलेला यदुनाथ, भावजयीच्या वासनेस बळी पडलेला सच्छील, सरळ स्वभावाचा बाळकू आणि सात मुलींचा बाप असलेला, दमेकरी पत्नीचा उबग आलेला वेंकेतच स्वतःला रमवू पहाणारा विष्णुपंत देखील यात एक वेगळीच छटा दाखवून जातो.

## दुःख, संवेदनांचे प्रकार

कितीतरी दुःखी माणसं ! पण या संग्रहातील त्या व्यक्तींची जात निराळी. सामान्य माणसांतील, सामान्यांचे प्रतिनिधित्व करणारी माणसे यात कमी-अपवादात्मक परंतु मोठ्या प्रमाणात विकृति असलेल्यांची चित्रणे जास्त. वास्तव चित्रणातून जीवनातील भीषणता कलात्मक पातळीवर नेऊन दाखविण्याचे जयवंत दळवींचे कसब विलक्षण वाखाणण्याजोगे आहे. 'दिगंबर' हा कुत्रा. पूर्वजन्मींचा योगी असावा. अशा समजुतीने पाळला जातो. पण एक कुत्री दिसते. दिगंबर मागे धावतो. ट्रकखाली चिरडतो. श्रद्धांच्या चिंध्या होतात. अशा तऱ्हेची कलात्मक वास्तवता साकार करू शकणारे दळवी काही ठिकाणी मात्र घसरतात. विकृति हा माणसाच्या स्वभावातील एक भाग आहे. अनेकात विकृति असतात. महा भयाण. शुभ्र कपड्यांतील जनावरेच भोवती फिरताहेत असे वाटावे इतपत उग्र. पण त्यांचे जे वर्णन केले जाते ते अपरिहार्यतेने आलेले असले तरच साहित्यात त्यास स्थान आहे. 'तुझ्यावर-राग नाही, माई'मधील वर्णने ही अपरिहार्य वाटत नाहीत. समस्या खरी असली तरी स्वतःच एक विकृत चित्र बनलेल्या 'अजगर' (खानोलकर) मधील पांगळ्याचीच हा शंभो आठवण करून देतो.

काही अपवाद सोडले तर वास्तव जीवनातील भयाण व विदारक सत्याचे दर्शन घडविणाऱ्या ह्या कथा विलक्षण प्रभावी आहेत. सिनेम्यात स्वार्थाच्या व मोहाच्या आवेगात नागाचा बळी घेणारा 'मणी' मधील नागनाथ हा आपला वंशज वाढणार नाही म्हणून दुःखी आहे. किमान आता पिढीचा उद्धार करावा म्हणून नागाकडून चावून घेऊन










मरण पत्करण्याच्या दुर्दम्य लालसेने तो नागांच्मा मागे लागतो. पण जवळ येऊनहि एकहि नाग त्याला दंश करीत नाही. तो मात्र वणवण भटकतो आहे, मृत्यूच्या शोधात. स्वातंत्र्यपूर्व काळात क्रांतिकारक असलेला 'रामलाल' आता मातृभूमीस व घर आणि माया यांस पारखा झालेला आहे. नातवंडांत खेळावे, ही इच्छा. दत्तक बाप म्हणून जेव्हा त्यास आश्रय मिळतो तेव्हा मात्र तो अपघातात मरण पावतो. धर्म व देव याना थोतांड मानणाऱ्या विसूभाऊ व अहिल्याबाईना कम्युनिस्ट क्रांतीचे अनपेक्षित रूप दिसताच भ्रमिष्टावस्था प्राप्त होते आणि अखेरीस अहिल्याबाई पिंपळाच्या पाराभोवती 'प्रदक्षिणा' घाल लागतात.

## परिस्थितीच्या खेळाचे रेखाटन

विकृतीची विकृतताच येथे नाही. इथे आहे परिस्थितीचा खेळ. दैवाच्या फटकाऱ्याबरोबर श्रद्धा व निष्ठाच विचलित होतात. बुरखे फाटतात. सत्याचे दर्शन होते. त्याचा स्वीकार करण्याचा ती माणसे प्रयत्न करतात. पण दैवास हेहि पाहवत नाही. केवळ वंचनाच पदरी पडते. ही सारी पात्रे आपले हृदय गलवलून सोडतात. कालवाकालव होते हृदयात.

दळवींचे वैशिष्ट्य हे की, ही पात्रे त्यानी समर्थ शैलीत साकार केली आहेत. त्यासाठी त्यानी अनेक मार्गांचा अवलंब केला आहे. 'कांता'मध्ये त्यानी अखेरीस अचानक धक्का देऊन आकर्षकता निर्माण केली आहे. 'मी'स ज्यावेळी हे समजते की कांता व तो एकाच आईच्या पोटी जन्मास आलेली आहेत त्यावेळी जेवढा हादरा त्याला बसतो तेव्हढाच वाचकासहि बसतो. जिवंत स्वभावचित्रे हे तर दळवींच्या शैलीच्या समर्थत्वाचे प्रत्यक्ष प्रतीक. कांता, बिहारी, नागनाथ, 'उत्तरवार'-मधील गौतम काका, भटीणवाय, रामलाल, ह्या साऱ्या व्यक्ति आपणास कुठे तरी भेटतील, अशाच समजुतीत वाचक पुस्तक खाली ठेवतो. प्रत्येक कथेतला 'मी' हा केवळ निवेदक नाही. कथेतील पात्रांशी वा घटनांशी त्याचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध आहे. त्यामुळे तो अनाहूत त्रयस्थ वाटून रसभंग होत नाही. सहज, सरळ निवेदनातून अचानक संभाषणे चालू होतात आणि आपण त्या पात्रांशी समरस होऊन जातो.

छोट्या छोट्या पण मार्मिक दृष्टान्ताचा माफक उपयोग करून लेखकाने दृश्य व पात्रे जिवंत बनविली आहेत. 'रुक्मिणी'तील विठ्ठलराव समोर येताच तेच असे – 'कमरेवर हाताच्या मुठी टेकवून तब्बल अठ्ठावीस युगे उभे राहिल्यासारखे ते ताटकळत उभे होते.' किंवा 'स्फोट' मधील रंगाजीची व्यथा चटकन् डोळ्यात उभी करते ती वाक्येहि अशीच–'कमरेतली दुखापत चुचकारत रंगाजी त्या वेताच्या खुर्चीत पोतडी टेवल्यासारखा बसला.'

## प्रत्ययकारी व्यक्तिदर्शन

समर्थ शैलीच्या द्वारे लेखकाने पात्रे प्रत्ययकारी बनविली आहेत. पण 'वर्म'-मधील नागूकाका अखेरीस गाईच्या तोंडी जाणारी सुतरफेणी खेचून घेऊन खाऊ लागतो ह्या चित्रणामुळे त्या पात्रात कदाचित व्यक्ति–जीवनातील वास्तवता येत असेल. पण त्या स्वभावचित्राचा दर्जा मात्र खालावतो. जानवे, शेंडी व केशवपनासारख्या प्रथा यानाच धर्म समजणाऱ्या व त्यावर प्रामाणिक निष्ठा ठेवणाऱ्या माणसांची निष्ठा खरी आहे पण ती पूर्वीच्या ठिकाणी आहे, हे जाणवायला हवे. शेवटच्या प्रसंगाने त्यास गालबोट लागते. परिणामात न्यूनता येते.

## प्रत्ययकारी कथा

पण हा एक अपवाद सोडला तर उर्वरित कथा ह्या विलक्षण प्रत्ययकारी व परिणामकारक आहेत. पावसाच्या अभावी व्याकूळ झालेल्या जनतेने आतुरतेने पर्जन्यदेवाची वाट पहावी पण एका उबट व अंधाऱ्या आभाळलेल्या वातावरणाशिवाय काहीच न मिळून ती बेचैन व्हावी; हे असं का? कां?' असा प्रश्न निर्माण व्हावा, नेमके तसेच ह्या कथा वाचून वाटते आणि हा एकत्रित परिणाम हे ह्या संग्रहाच्या यशाचे गमक आहे.

**–प्रा. विलास चाफेकर**

[**रुक्मिणी.** ले. **जयवंत दळवी** प्रकाशक मॅजेस्टिक प्रकाशन मुंबई ४ पृष्ठे २८० मूल्य रु. ७.५०.]









( पान ८ वरून—चक्र.... )

वेधून घेण्याइतका आवाज करण्याचेहि त्राण नव्हते त्याला. हातावर हात आपटून आवाज करायचा. पुढचा सगळा अनुक्रम पाठ. घोटीव. रांगेतल्या प्रत्येकाच्या पायावर डोके ठेवायचे. तिथे जरा सैल थांबलेली ती मोठी पोर एकदम दचकली. सिंह दिसल्यावर शेळी दचकेल तशी. गंगाधरने त्या दिशेने पाहिले. दूरवर एक काळाकभिन्न रेडा तीक्ष्ण नजरेची कटार परजीत उभा होता! उग्र मिशा घुमसत होत्या. सांगून दिलेला खेळ करीत नाही म्हणजे काय? पैसा. आणखी पैसा हवाय. भांडवलशाहीच्या सावलीत वाढलेली दुसरी भांडवलशाही. पिळवणूक. मनुष्य हा 'प्राणी' आहे हे आप्तवचन उगीचच विसरायचे म्हणजे काय?

बघता बघता गर्दीतून एक वेडा वाट काढीत पुढे सरकला. आयलंडच्या मध्यावर उभा राहून रहदारीचे नियंत्रण करू लागला. त्याची कॉमेंटरीहि चालूच होती. मोठी गाढी आणि तात्विक. बहुभाषिक असावा तो. इंग्रजी, हिंदी, मराठी बोलत होता. भाषेच्या पलिकडचे काही त्याला दिसत होते. उमगले होते. ते आपल्या अन्न बांधवाना तो समजावीत होता. स्थिर, स्तब्ध असा पुतळा, नियंत्रक तो वेडा, अविरत ओघळणारी रहदारी, समाजव्यापारांचा रहाट, जीवनाचा ओघ. गंगाधर क्षणभर ते चित्र पहात उभा राहिला. कुणाला वेडा म्हणावं आणि कुणाला शहाणा समजावं ते त्याला कळेना. जरा वेळानं तिथं पोलिस आला आणि त्यानं त्या वेडयाला पिटाळलं. तो निघून गेला.

गंगाधर तिथून निघाला. फिरत फिरत तो समुद्राच्या तीरावर आला. सागर प्रचंड लाटानी धडका मारीत होता. कशावर? कशासाठी? विस्तीर्ण वाळूच्या किनाऱ्यावर गर्दी झाली होती. जावे तिकडे गर्दी. ठिकठिकाणी बसलेली जोडपी. एकत्र येऊ इच्छिणारी, एकत्र आलेली. त्यांच्यामधून तो वाट सांपडेल तसा हिंडला. काही अवघडून बसलेल्या लाजऱ्या, बुजऱ्या तरुण-तरुणींच्या मधून त्याने लवकर पाय उचलला. तेच ते शब्द ऐकायला त्याला कंटाळा वाटत होता. ज्या शब्दाना अर्थ नाही, आणि एकाचा अर्थ दुसऱ्याला अभिप्रेत नाही अशा या संसारात त्याला अर्थ वाटत नव्हता. हेच शब्द ऐकायला येणार होते. आज, उद्या आणि निरंतर. पण डिक्शनरीतले शब्द आणि कॅलेंडरातील दिवस यांच्या तोच तोपणाचा गंगाधरला कंटाळा वाटत होता. साऱ्याच प्रेमकथा अर्थशून्य होत्या!

....प्रथम कशीतरी भेटली आणि नंतर भेटतच राहिली हीच त्याहि प्रेमकथेची सुरुवात होती. पण भेटत राहिल्यावर मात्र स्वप्नांचा कशिदा विणला जात होता. एक भूक थैमान घालीत होती हे चक्क दिसत होते पण तरीहि तिच्याभोवती दैवी वलय सळसळत असावे असा भास करून घ्यायचा प्रयत्न. अनेकदा भेटी. कधी उद्यानात, कधी क्रीडामैदाना-



## 'कलेचे' पाय पाळण्यात....

**बाळाचे पाय पाळण्यात त्याप्रमाणे कलेचेही पाय पाळण्यात दिसतात–दिसत असावेत. अन्यथा बारा वर्षाची, ८ वीत शिकत असलेली एक अमिता दीनानाथ दलाल ही मुलगी एकेदिवशी केवळ ब्लेडचा व रंगांचा उपयोग करून एक चित्र रेखाटते, ते चित्र लंडनच्या १० व्या गर्ल गाईड्सच्या कॉमनवेल्थ हेड क्वार्टर्स चित्रकलास्पर्धेत बालमोहन विद्यामंदिर तर्फे पाठविले जाते. ११ ते १२ वर्षांच्या गाईड ग्रुपमध्ये त्या चित्राला पहिल्या क्रमांकाचे बक्षिस मिळते. खास प्रशस्तीपत्रही मिळते हे कसे घडले असते? अमिताच्या कलेचे हे आंतरराष्ट्रीय कौतुक 'बालमोहन विद्यामंदिर'च्या अध्यापक–वर्गाने आपुलकीने तिचा हा गुण जोपासल्यामुळेच झाले आहे यात संशय नाही. ती बक्षिसाची लहानशी रक्कम तिने रत्नागिरी वादळग्रस्तांना मदत म्हणून पाठवून आणखी लहानातले मोठेपण सिद्ध केले आहे. अमिताच्या ह्या यशाबद्दल बालमोहन विद्यामंदिराच्या चालकांचे मन:पूर्वक अभिनंदन !**

वर. कधी नाटचगृहात, कधी चित्रगृहात. मातीच्या धुळवडीवर प्राजक्ताची फुले टपकत होती. धुंद वास आणि गरम रक्त. प्रवाह एकाच दिशेने धावत होता. वेगाने, बेभानपणे. केवळ आठवण झाली तरी काळजात फुलपाखरे उडत होती. कधी साड्यांच्या दुकानातील 'शो-केस' मधील हिरवी साडी. उभी झळकताना दिसली तरी रक्त पेटत होते. मेंदूला मुंग्या येत होत्या. त्या भरदार, उंच, सडपातळ देहाची जादू मातीतून साकारली होती. ब्लाऊजखाली दिसणारी पोटाची उघडी पट्टी आत मशाली पेटवीत होती, आणि पुढे ओढून घेतलेल्या वेणीच्या शेपटाने गळफास आवळला जात होता. सारी माती! केवळ मातीच्या मस्त वासाने चित्र मस्तवाल झालेले! पण मन ते मान्य कसे करणार? त्या मातीभवती मखर घालायला हवे होते. मखरामागे तेजोवलय चकाकायला-हवे होते. आणि ते चकाकले. एका गहिऱ्या सायंकाळी दोन मृत्तिका-मयूर काळाच्या दबकावणीला खो देऊन सर्व काही विसरले. फक्त मातीचा वास सोडून——

"शामा' फक्त एक घोगरा आवाज. त्याचा.

'हं'. सशब्द होण्याचा दुसरा दुबळा प्रयत्न. तिचा.

—आणि तिच्या ओठाचे अमृत तो आकंठ प्यायला. उघड्या पोट-पट्टीवर चुंबनाचे शेकडो डोळे फुटले. तिच्या केसाच्या वासाने त्याने अभ्यंगस्नान केले. तिच्या त्या स्वर्गसुखात तो स्वत:स विसरला, आणि त्याच्या टोचणाऱ्या, दुखवणाऱ्या, प्राशणाऱ्या, जाळणाऱ्या निकट मिठीत तिच्या नसानसात पोळत जाणारी एक विजेची भूक थैमान घालीत राहिली.....

मग. ते तेजोवलय पुढे सरकले.

"शामा, खरेच केवळ तुझ्या शरीरावर मी प्रेम करतो असे नाही. मला तू हवीस. आत्म्यासकट शरीर हवे. एक गहिरे जीवन आपण जगू. शामा, शामा——"

आणि तिच्या उत्तराचे शब्द फक्त तिच्या शरीरातून त्याच्या शरीरावर घुसळत होते. त्या काळातील ते साधे दिवस कधीहि रेशमी शाल पांघरल्याशिवाय आले नाहीत. समुद्र किनाऱ्यावरील वाळूत बसणे म्हणजे काय मोठे काव्य झाले? पण एखाद्या बहरलेल्या प्राजक्ताच्या फांदीसारखा तो दिवस, ती सायंकाळ, त्या दोन घटका वाटत. तिचे ते ओणवे बसणे, गुडघ्याभोवतीची हातांची नाजूक मिठी, साडीच्या गोल घेरातून बाहेर उमटलेली दोन पावले आणि बुडत्या सूर्याकडे पहाणाऱ्या चेहऱ्यावरील भुरभुरणाऱ्या चार दोन बटा. तो तिच्याकडे पहात राहायचा. दोन शरीरे अलग असली तरी तियेहि त्यांचे कमालीचे एकत्व झालेले असे. त्यातून कसा चिवट, जित्रट रस पाघळायचा, परस्पराना पार एकमेकात मिसळून टाकायचा!

त्या गुंगी आणणाऱ्या गत घटनांची, प्रसंगांची आठवण आज त्याला किती अलिप्तपणे होत होती. त्यावेळी कित्येकदा त्याला वाटले की तरुण स्त्री-पुरुषांच्या मीलनाचे काव्य प्रसवणाऱ्या परमेश्वराला त्याहून उच्च कोटीचे काव्य आजतागायत प्रसवता आलेले नाही. तो कैफ, ती अर्पणाची भावना, स्वत:च्या सुखासाठी करावयाचे ते अमोल दान, ते अलगपणातहि होणारे, होत असणारे सर्वस्वाचे दान. भोगलेल्या कैफाच्या, तृप्तीच्या आठवणीनेहि आज इतके व्याकूळ व्हायला होते तर ते प्रत्यक्ष क्षण किती बेभान, धुंद करणारे होते! होतेच.

आजहि ती होती. मांडलेल्या संसारात आजहि ती जोडीदारीण होती. तशीच प्रेमळ, त्यागी, सोज्वळ, पण अवघी जादूच संपली होती. आता साक्षीवृत्तीने सगळ्याचा विचार करता येत होता. भोगालाहि अलिप्ततेची झालर आली होती. व्हिस्कीचा पेग पिऊन ओठ पुसून टाकावेत इतकी अलिप्तता. कैफ, धुंदी, ग्लानी खरी पण तरीहि अलगपणा.

. . .त्याला वाटले की केवळ काळाच्या या चमत्कारिक रसायनाने उभ्या मूर्तीवरील धुंदीची वलये आणि मस्तीची मलई जळून जाते आणि खाली एक मूठभर माती उरते.

. . . बावीसशे रुपयांची अत्तरे वीस वीस हजारांच्या शालूवर ओतून तो नटसम्राट जेव्हा नाट्यमंचकावर येई तेव्हा शेवटच्या रांगेतील प्रेक्षकांची तबियत खुलून फुलासारखी होई. आता स्वरांच्या पायघड्यावर त्याचे मोटके दोन चार जण उचलून

अनुक्रमणिका






आणून ठेवित आणि रेकणारे गाणे हजारो चुकचुकणाऱ्या पालींच्या ठेक्यावर कशी-तरी सम गाठे! काश्मिरी गुलाबाचा केलेला तो राजबिंडा जवान दीड हात खादीच्या कुडत्यात आगीसारखा परक्या सत्तेच्या मागे लागला होता, तेव्हा वीत वीत छात्याहि फुटून दुभंग झाल्या, पण तो लपून बसलेल्या जागेचा ठावठिकाणा बोलल्या नाहीत. कसला तो काळ, ती आग, तो रक्ताचा सडा आणि तिरंगा-प्यारा आणि फिरंगा न्यारा! आज त्याची इज्जत डोंगरापलिकडच्या बंदुकानी मातीत मिळवली होती आणि ठायी ठायी स्फुरणारे बाहू आणि गुरगुरणारी छाती, सेनापतीच्या स्थंडीलाची माती, झालेली पहात होती.

त्याला वाटले आगीची माती करणारे रसायन काळाच्या पोतडीत आहे तर मातीची आग करणारेहि नसेल काय? त्याचा शिडकावा चौफेर करावा आणि मातीच्या शरिरातील मस्ती पुनः पेटवून द्यावी, देशभक्तांच्या बाहूंत लोहाचे बळ ओतावे, प्रेयसींच्या नसानसात वीजेचे पाणी खेळवावे, तमाम अर्धनग्न वैराग्यांची शरिरे जळजळत्या रेशमी पाखानी शाकारावी, त्यातलाच एखादा लफंगा मयूर सिंहासनावर बसवावा आणि राजाच्या राणीला त्याचेवर छत्रचामरे धरून उभी करावी. दोन फितीच्या आणि चार चांदाच्या सेनापतीस कान पिळून ललकारी ठोकण्यास भाग पाडावे आणि मग 'हुःशार, निगाह रखो' म्हणून ती ललकारी संपताच चिंध्यांचे गाठोडे डोक्यावर घेतलेल्या अर्धनग्न भणंगाने रुबाबाने पावले टाकीत दरबारात पदार्पण करावे. तेव्हा साऱ्या मानकऱ्यानी त्यास लवून मुजरा करावा आणि मग न्यायनिवाडा सुरू करावा——

"आपल्या सत्ताप्रीतिसाठी या राष्ट्राध्यक्षाने दोन कोटीचे खडे सैन्य उभारले. तमाम जनतेस वेठीस धरले. परक्या मुलुखावर असत्याचे गरळ ओकीत बॉम्ब फेकले. आणि असे असूनहि त्याच्या राष्ट्रात इतके अर्धनग्न आहेत, इतके भुकेकंगाल आहेत, इतके सवतीच्या वेठीला जुंपले आहेत–"

आणि मग राजाने निर्णय द्यावा की त्या सत्तापिपासूला दगडानी ठेचून मारा!

पण एवढ्यातच राजा कंटाळला. आज याने त्याला मारायचे, उद्या त्याने याला. दहा हजार वर्षे हे मारण-मरण चालू आहे. किती डोकी उडविली. त्याला केवळ डोक्यांची एक गगनचुंबी रास दिसली, आणि बत्तीस दातांच्या सहस्रावधी कवळ्यांच्या विकट हास्याचा वर्षाव त्याचेवर झाला.

— तो नग्न भिकारी राजा सिंहासनावरून उठून धावत सुटला तेव्हा आपले चिंध्यांचे गाठोडे घेण्यास तो विसरला नाही. चिंध्या गोळा करणे हाच एक मोलाचा मानवी व्यवसाय आहे' असे त्याला वाटत राहिले!

...गंगाधर समुद्रावरून परत फिरला. एक दिवसाची त्याची चक्कर संपली. लाल लाल सूर्याचा गोळा समुद्रात बुडाला. त्या समुद्राच्या लाटा आपल्या मर्यादेत तशाच घुमाकूळ घालीत राहिल्या. त्या लाटाना मर्यादा होत्या तशाच किनाऱ्यावरच्या स्थिर जीवनालाहि मर्यादा होत्या. आणि आयुष्य म्हणजे दुसरं तिसरं काही नसून ज्याने त्याने आपल्या मर्यादा ओळखणं इतकंच काम उरलं होतं!

तो घरी आला. कॅलेंडरवरची तारीख त्याने उलटून टाकली.

गेलेल्या दिवसाचा आणि येणाऱ्या दिवसाचा रंग कॅलेंडरावर सारखाच होता!

● ● ●



# "समाजवादी" नानासाहेब गोरे

महाराष्ट्राच्या गेल्या तीस वर्षांच्या राजकीय व सामाजिक, साहित्यिक आंदोलनाशी संबंध आल्यामुळे ज्या व्यक्तींच्या कर्तृत्वाचा ठसा महाराष्ट्राच्या मनी-मानसी उमटला आहे, त्यात प्रजासमाजवादी पक्षाचे विद्यमान अध्यक्ष साथी ना. ग. तथा नानासाहेब गोरे यांचा उल्लेख करावा लागेल. काही माणसे चळवळीतून मोठी होत जातात, काहीच्या मोठेपणामुळे, अंगभूत गुणवत्तेमुळे ती ती कार्ये, आंदोलने मोठी ठरत असतात. महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाची परंपरा सुदैवाने 'केवळ राजकीय' अशी एकांगी कधीच नव्हती. राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक अशी विविध अंगे तिला होती असे दिसून येते. लोकमान्य टिळक, आगरकर, चिपळूणकर, खाडिलकर, केळकर, कोल्हटकर, केतकर यांजपासून तो थेट आजच्या चिंतामणराव, कै. काकासाहेब गाडगीळ, ना. ग. गोरे, एस्. एम्. जोशी, डांगे यांच्यापर्यंत ही परंपरा एकांगी राहिलेली नाही हेच सिद्ध होते. राजकारण ही एक काळाची अपरिहार्य गरज वा मागणी म्हणून ही मंडळी राजकारणात पडली. पण राजकारणी रुक्षतेची बाधा त्यांना झाली नाही.

साथी ना. ग. गोरे हे नुसते राजकीय पुढारी नाहीत. तर ते एक शैलीदार लेखक आहेत. उत्तम वक्ते आहेत. थोर अभ्यासक आहेत. चिंतक आहेत आणि कृतिशूर समाजसेवक आहेत. मैदान मारणे ही गोष्ट जेवढी महत्वाची गोष्ट ते मानतात (राजकारणात ते मारता आलेच पाहिजे) तितकीच एखादी कलाकृति निर्माण करताना, चिंतन मांडताना वा एखादा राष्ट्रीय महत्वाचा निर्णय घेताना शांतपणे काम करणे हीही गोष्ट नानासाहेब महत्वाची मानतात. गोवामुक्ति आंदोलनाचे आधीची त्यांची कितीतरी व्याख्याने मी ऐकली आहेत. गोव्याची कोंडी अखेर शासनालाच फोडावी लागेल असेच त्यांचे मत होते. पण गोवा मुक्ति आंदोलनाचे आपणही काही देणे लागतो ही भूमिका स्वीकारायची ठरल्यावर नानासाहेब हे सेनापतींचा हात हाती घेऊन गेव्यात गेले. त्या पहिल्या तुकडीला ज्या यमयातनातून जावे लागले त्यांची वर्णने ज्यांनी ऐकली असतील त्यांनाच गोरे-बापटांच्या महत्तमतेची कल्पना येईल. पण "वन्ही तो चेतवावा रे" ह्या न्यायाने गोरे-बापटांनी पेटवलेला वन्ही पेटला व त्याचे अंतिम पर्व अखेर गोरे म्हणत होते त्याप्रमाणे




भारतीय शासनाने ठाम निर्णय घेऊन लिहिले. चीनच्या आक्रमणाचे वेळी गोरे सीमेवर जाऊन आले होते. त्यांनी लेख लिहून इशारेहि दिले होते. भाषणेहि दिली होती. राजकीय नेता हा देशाचा 'जागल्या' असतो. त्याने सहस्रनेत्रानी पहायचे असते. गोरे ह्यानी तसे पाहिले यातच त्यांचे नेतृत्वगुण दिसतात. पाकिस्तान, नक्षलवारी इत्यादि राष्ट्रीय प्रश्नांवरची गोऱ्यांची मते ही शंभर टक्के राष्ट्रवाद्यांची मते आहेत. गोरे केवळ राजकीय पुढारी म्हणून मला महत्वाचे वाटत नाहीत. ते रसिक आहेत. प्रेमळ आहेत. ललित प्रकृतीचे आहेत. कृतिशूरही आहेत म्हणून मी त्यांना अधिक मानतो. आज गोरे साठी ओलांडून पुढे निघाले आहेत. उमेद कायम आहे. 'व्हिजन' कायम आहे. दृष्टि अविचल आहे. निष्ठा अढळ आहेत. आपल्या राजकारणातील पक्षीय अंवतेने कितीतरी चांगल्या माणसांच्या शक्ति ह्या देशकारणी हव्या तशा लागल्या नाहीत ही खंत आता बहुसंख्य जनतेला जाणवते आहे. ना. ग. गोरे यांच्या बाबत असेच म्हणावे लागते. तरीही गोरे प्रयत्नशील आहेत. राहतीलही ! ह्या वाटचालीत त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो हीच प्रार्थना !



# श्रेष्ठ पत्रकार— पां. वा. गाडगीळ

महाराष्ट्राचे एक वयोज्येष्ठ तपस्वी, साधक पत्रकार व 'नवशक्ति' दैनिकाचे विद्यमान संपादक श्री. पां. वा. गाडगीळ यांना श्रेष्ठ पत्रकार म्हणून बी. जी. हॉर्निमन पारितोषिक देण्यात आले. त्याआधी 'सोविएट देश'नेही असाच गाडगीळांच्या पत्रकर्तृत्वाचा सन्मान केला. वस्तुतः एका अर्थाने हे सारे मानसन्मान गाडगीळ यांना ह्यापूर्वीच मिळायला हवे होते. कारण पां. वा. गाडगीळ यांचे पत्रकर्तृत्व हे केवळ महाराष्ट्रा्यात नाही. आज भारतीय पत्र-








कारांमध्ये त्याना मानाचे पान राखून ठेवले जाऊ शकते ही वस्तु-स्थिति आहे. गाडगीळ ह्यांनी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत जीवनाची वाटचाल केली आहे. "दरमहा ४० रुपयांची प्रुफ करेक्टरची नौकरी लागताच लग्न केले. जवळ एक पैसाही नव्हता. थोडेसे कर्ज काढले. एकूण लग्नखर्च ७० रु. आला. मुलगी पहाण्याचा कार्यक्रम दोनतीन मिनिटातच झाला. लग्न झाले व नौकरी सुटली. दोन महिने वेकार होतो. पुन्हा प्रुफ करेक्टरची नौकरी लागली. पुढे टायफॉइडने आजारी पडलो १४ दि. वेशुद्ध होतो.———" (कित्ता – मनोहर ४०० वा अंक) ह्या त्यांच्याच शब्दांत वर्णिलेल्या परिस्थितीवरून गाडगीळांच्या एकूण तत्कालीन आर्थिक स्थितीची कल्पना येईल. प्रुफ करेक्टर झालेले पां. वा. गाडगीळ पुढील आयुष्यात लोकमान्य, नवशक्तिसारख्या दैनिकांचे संपादक झाले. पत्रकार परिषदेचे अध्यक्ष झाले, श्रेष्ठ पत्रकार म्हणून त्यांचा सन्मान झाला, त्यांच्या अग्रलेखांना ग्रांथिक स्वरुप प्राप्त झाले. (माझे वृत्तपत्रीय लेखन–पॉप्युलर) आणि आता देशी-विदेशी सन्मान मिळवून, परदेश दौरे काढून गाडगीळ 'लोकमान्य' व 'राजमान्य'ही झाले आहेत. पण गाडगीळ यांना हे जे यश लाभले आहे त्याची कारणे मात्र त्यांच्या व्यक्तित्वाच्या जडण–घडणीतच आहेत. गाडगीळांची आजची कीर्ति ही "कष्ट–सिद्ध" आहे. "स्वयं-सिद्ध" आहे. आजचा काळ हा 'स्पेशलायझेशन'चा काळ आहे. गाडगीळ यांनी 'प्रुफकरेक्टर'ची भूमिका पत्करली असली, तरी त्यांचा पिंड मात्र विचिकित्सक राजकीय अभ्यासकाचाच आहे. कुठल्याही क्लिष्ट विषयाचा अभ्यास नाकारणारी, वरवरच्या थापा-गप्पांनी वेळ मारून नेणारी प्रवृत्ति गाडगीळांची नाही. कुठल्याही राजकीय, सामाजिक, आर्थिक, राज्यकारभारविषयक, शैक्षणिक विषयावावत लिहावयाचे असो, गाडगीळ त्या विषयांची सर्वांगीण माहिती मिळविण्याचा प्रयत्न करतील. त्यांसाठी लागणारे शारीरिक श्रम हे गाडगीळांना 'श्रम' वाटणार नाहीत. एक प्रसंग मला आठवतो. भारताची राज्यघटना (प्रजासत्ताकाची) नुकतीच संमत झाली होती. ती संमत होत असताना व झाल्यानंतरही सर्वत्र टीका-प्रतिटीका केली जात होती. त्या काळात आपली घटना नेमकी कशी आहे, तिचे गुणदोष कोणते आहेत याचा संपूर्ण व सर्वांगीण अभ्यास करून गाडगीळांनी काही व्याख्याने दादरच्या अमरहिंद मंडळाच्या वतीने दिली होती. ती सारी व्याख्याने ऐकण्याचे भाग्य सुदैवाने मला लाभले होते. त्यानंतरही गाडगीळ यांची अनेक व्याख्याने मी ऐकली. अग्रलेखही वाचतो. त्या साऱ्या भाषण–लेखनामागे मला कृशकाय-शरीरातले साधक मन दिसते. उदंड उत्साह दिसतो. श्रद्धा-निष्ठा दिसतात. गाडगीळांचे आजचे (लौकिक) यश ही त्यांच्या तीस चाळीस वर्षांच्या सततोद्योगाची समाजाने दिलेली पावती आहे. ह्या निष्ठा, ही साधना, हे कष्ट, ही अभ्यासू चिकित्सक वृत्ति ही खास त्यांची अशी कमाई आहे. गाडगीळांचे वय झाले. पण वृत्ति उल्हसित आहेत. एखादा नवा ग्रंथ दिसला तर तरुणाच्या उत्साहाने गाडगीळ त्यावर आजही तुटून पडताना दिसतील.

अशा ह्या तरुण 'ज्येष्ठ' पत्रकाराचा हा जो सन्मान झाला आहे त्यावद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो !

## तप पूर्ण झाले–

बावडेकर साठ वर्षांचे झाले. 'आलमगीर' बावडेकर साठ वर्षांचे झाले. विविधवृत्तातून ज्ञात झालेले आणि 'आलमगीर'च्या नव्या संसारात रत झालेले हे व्यक्तित्व आता साठी ओलांडून एका मोठ्या अवस्थेत पदार्पण करीत आहे. एक ललित आणि तितकेच 'घणाघाती' व्यक्तित्व आता जीवनाच्या एका नव्या क्षेत्रात पाऊल टाकते आहे. चं. वि. बावडेकर ही एक व्यक्ति नाही, ती एक प्रकृति आहे. त्या प्रकृतीचा धर्म आहे प्रखर राष्ट्रनिष्ठा ! परखडपणे बोलणारी. ठामपणे उभी रहाणारी ! "सारे काही बदलेल, पण भीष्म बदलणार नाही" असे 'मत्स्यगंधे'तला भीष्म म्हणतो. बावडेकर यानी जी पत्रसाधना केली आहे तिच्या 'धर्मा-बद्दलही असेच (सुदैवाने) म्हणता येण्यासारखे आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात हाच 'धर्म' बावडेकरांच्या लेखणीने पाळला. स्वराज्यात हा धर्म ते नेकीने पाळताना दिसताहेत. राज्यकर्ते स्वकीय झाले म्हणजे नंदनवन निर्माण होतेच असे नाही ह्याचा दारुण प्रत्यय भारतीय जनता गेली २० वर्षे घेत आहे. 'राष्ट्रीय एकात्मता' हा परिषदांचा विषय नाही. तो 'प्रत्यया'चा विषय आहे ही विदारक जाणीव होते आहे. भाषिक राज्ये आली. पण भांडणे वाढली. अशा काळात सातत्याने 'राष्ट्रकल्याणा'चा विचार निर्भीड-पणे मांडणाऱ्या लेखक पत्रकारांची गरज होती. 'आलमगीर' बावडेकर ही कामगिरी चोखपणे बजावीत आहेत. अगदी एकाकी-पणे का होईना, पण निष्ठेने बजावीत आहेत. दैनिकाच्या 'साप्ता-हिक' आवृत्यांमुळे नुसती साप्ताहिके काढणे, चालविणे ही गोष्ट केवळ व्यवसायनिष्ठा वा अमाप पैसा ह्यातूनच घडू शकते. बावडे-करांजवळ अमाप पैसा नाही. पण निष्ठा आहे. लेखणीबद्दलचा ठाम विश्वास आहे. व्यावसायिक नीति ते जाणतात. त्यांच्या ह्या 'निष्ठा'वर प्रेम करणारी अनेक सश्रद्ध माणसे त्यानी गेल्या तीस चाळीस वर्षात आपल्याभोवती जमा केली आहेत. त्यातूनच बाव-डेकर 'उभे' राहिलेले आहेत. साठी ओलांडली आहे. एक तप संप-लेले आहे. नव्या 'आश्रमा'त ते पदार्पण करीत आहेत. त्यांचा हा प्रवासही चांगला होवो, सत्कारणी लागो अशीच कुणी चाहता अपेक्षा करील. बावडेकरांच्या व्यावसायिक संसाराला सक्रिय हातभार लावण्यासंबंधी विनंति काही बडया बडयांनी केली आहे. हे 'एकाकी' असलेले पण 'एकट्यासाठी' नसलेले पत्रकर्तृत्व जग-विणे, ते राष्ट्रचरणी समर्पित करणे हे समाजाचे कर्तव्य नव्हे काय ?

### महत्वाची सूचना

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**



## "मॅजेस्टिक" कोठावळे

समर्पक व यथार्थ वर्णन ! कोठावळ्यानी 'मॅजेस्टिक' हे नांव नेमके कां घेतले, मॅजेस्टिक सिनेमाशी त्या नांवाचे काय नाते आहे ते मला ठाऊक नाही. पण 'मॅजेस्टिक' हे कोठावळ्यांचे 'स्वप्न' असावे असा माझा तर्क आहे. रॉयल, मॅजेस्टिक असे काहीतरी घडावे– घडवावे असे स्वप्न त्याच परिसरातल्या फूटपाथवर वावरताना, श्रीगणेशा गिरवताना कोठावळ्यांच्या डोळ्यात तरळले असले पाहिजे असे आता मला वाटते. आज कोठावळे हे (काहीच्या दृष्टीने) शेठ झालेले असले तरी कोठावळ्यांच्या एकूण व्यक्तित्वाला 'शेठ' हे बिरुद फारसं अन्वर्थक आहे असे वाटत नाही. कोठावळे खाण्यापिण्यात आणि गप्पात रंगतात– गप्पाही रंगतात आणि पानही रंगते. गप्पा रंगल्या की तंबाखू पानाची लज्जत घेत, चेहरा हंसरा ठेवीत पण तोंड वंद करून कोठावळे गप्पांचा आस्वाद घेतात. खूप ऐकणे आणि (पानाच्या तोबऱ्याचे निमित्त करून वा 'राजकीय' मौन म्हणून) कमीत कमी बोलणे हे कोठावळ्यांचे खास वैशिष्टच ! ऐसपैस कोठावळ्यांची साहित्यविषयक श्रद्धा फार जुनी आहे. ती केवळ व्यावहारिक व व्यावसायिक नाही. माझा परिचय साहित्यसंघाच्या परिसरातच झाला ही गोष्ट बोलकी आहे. ग्रंथप्रेमी मंडळ (की खादी मंडळ) स्थापून 'ललित' संसार त्यानी उभा केला आहे. 'ललित' वर संपादक म्हणून 'कोठावळे' यांचे नांव आहे. पण मुख्यत: 'साहित्यिक' 'चळवळीचे ते मुखपत्र झाले आहे. बऱ्याच वाङमयीन हालचालींचा परिचय 'ललित'-मधून प्रथम होतो. कोठावळे यांच्याशी बोलताना एक गोष्ट जाणवते. ती मला महत्वाची वाटते. लौकिक यश मिळवून, अनेक नामवंतांची साथ–संगत भोवती असूनही कोठावळे वेगळ्या अर्थाने 'मॅजेस्टिक' कोठावळे झाले नाहीत. ते माणूसच राहिले आहेत. त्यांचे 'मॅजेस्टिक बुक स्टॉल' मात्र खऱ्या अर्थाने मॅजेस्टिक रूप धारण करीत आहे. पंचवीस वर्षात मॅजेस्टिकने अनेक चांगली शैक्षणिक, साहित्यिक पुस्तके प्रसिद्ध केली. अनेक नवे उपक्रम सुरू केले. सरकारी पारितोषिके प्राप्त केली. 'ललित' काढले–प्रकाशक हे करणारच ! आज महाराष्ट्रात नांव घेण्यासारखी जी प्रकाशने आहेत त्यात मानाचे पान मॅजेस्टिकने संपादन केले आहे. म्हणून 'मॅजेस्टिक' व 'कोठावळे' यांचे अभिनंदन !!

**—आदित्य**

[पृष्ठ १० वरून —मराठी माणूस...]

**नाहीत. सरकारी पातळीवरही असे प्रयत्न तोकडेच होतात आणि होतात ते लालफितीत अडकून पडतात. लोकांनी आपण होऊन प्रयत्न करावे तर तशी जिद्द आणि दूरदर्शीपणा मुळातच कमी आहे. कारण प्रत्येक गोष्ट सरकारने करावी अशी आमची धारणा होऊन बसली आहे आणि त्यामुळे सरकार काही करीत नाही अशी टीका करीत रहाण्यात एक प्रकारे जहालपणाचाही आनंद मिळतो. जहालपणाच्या आनंदाचा महाराष्ट्राला एक शौकच आहे.**

सरकारवर होणारी टीका चुकीची असते असे मला म्हणावयाचे नाही. मुंबईत आणि महाराष्ट्रात जे उद्योगधंदे निघतात त्यात मराठी माणसांची भरती व्हावी अशासाठी सरकारला कितीतरी गोष्टी करता येण्यासारख्या असतात. खाजगी मालकांवर अनेक प्रकारे दडपण आणता येते. कारण प्रत्येक बाबतीत हे उद्योगपती सरकारवर अवलंबून असतात. आणि सरकारला दुखविणे हे त्यांच्या स्वभावातही नसते. **पण या गोष्टीचा फायदा घेऊन मराठी लोकांना निरनिराळ्या कारखान्यात अग्रहक्काने नोकऱ्या मिळाव्या यासाठी महाराष्ट्र सरकार दडपण आणीत नाही. आपल्यावर प्रांतियतेचा, संकुचितपणाचा शिक्का बसेल या भीतीने सरकारी नेते ग्रस्त असतात. इतर राज्यातील नेते या गोष्टी बेलाशक करतात, त्याना कोणी संकुचित म्हणत नाही. भित्यापाठीच ब्रह्मराक्षस लागत असतो ही साधी गोष्ट आमचे नेते विसरतात हेही महाराष्ट्राच्या पीछेहाटीचे एक कारण आहे. सरकारी मालकीच्या (पब्लिक सेक्टर) कारखान्यातील नोकरशाही बहुधा बिगर-महाराष्ट्रीय असते. आणि ती मराठी माणसाचे पाय टिकू देत नाही. पण तेथेही महाराष्ट्र सरकार अगतिक होते याला काय म्हणावे ?**

सरकारने या गोष्टी गाजावाजा करून करण्यासारख्या नाहीत. ज्या गोष्टी न बोलता करायच्या असतात त्यांच्यासाठी विधानसभेत आणि वृत्तपत्रातून हमरीतुमरीच्या चर्चा होतात ! म्हणजे इतर लोक ज्या गोष्टी गुपचूप करतात त्यासाठी ओरडून ओरडून आम्ही गाव गोळा करतो. आणि त्यामुळे अखेर आमचे काम होत नाही ते नाहीच. वस्तुत: ठिकठिकाणच्या कारखान्यात, कंपन्यात जागा कुठे आहेत हे हेरून तेथे आपली माणसे लावण्याची खटपट करीत रहाणारी अशी बिनसरकारी संघटना हवी आहे. एक प्रकारे हे काम एम्प्लॉयमेंट एक्स्चेंजसारखे वाटते. पण 'एम्लॉयमेंट एक्स्चेंज' हे लालफितीत गुंडाळले जाते. खाजगी प्रयत्न त्वरित आणि ताबडतोबीने होऊ शकतात. पण असा उद्योग केवळ ध्येयवादाने करणारी माणसे मराठी समाजात निघत नाहीत, हे मराठी माणसाच्या पीछेहाटीचे आणखी एक कारण आहे. मुंबईत येणारे इतर समाज या गोष्टी करीत असतात. आणि त्यांच्या 'संघटित प्रयत्नांपुढे मराठी लोकांचा टिकाव लागत नाही अशी खरोखर स्थिती आहे.

### अराजक कसे टाळता येईल ?

मुंबईत इतर प्रांतातले कफल्लक पण धाडसी लोक येतात आणि येथील परिस्थितीचा अनेक वाममार्गानी फायदा घेतात. मुंबईतील








झोपडपट्टयांतून चालणारे हातभट्टीचे धंदे, सरकारच्या आणि लोकांच्या जागा बळकावून तेथे बांधली जात असलेली बेकायदा घरे आणि रेल्वे, पोर्ट ट्रस्ट वगैरे ठिकाणी चाललेली 'लोखंडी टोळ्यां'-सारख्या टोळ्यांकडून चाललेली लूटमार या गोष्टी मुंबईतील अराजकाची लक्षणे आहेत. या सर्व उद्योगात सोन्याच्या चोरट्या आयातीचा समावेश केला म्हणजे हे अराजकाचे चित्र पूर्ण होते. बुद्धिमान, साहसी, बेफाम अशा या लोकात मुख्यतः परप्रांतीय लोकांचाच भरणा आहे. मराठी लोक कुठे तरी नोकरी करतात आणि थोडीफार लांच खाऊन असल्या प्रकारांना मदत करतात. हे सगळे चित्र भीषण आहे. पैसे मिळाले म्हणजे माणसे प्रतिष्ठित होतात. अशा चोरट्या धंद्यात पैसा मिळवून प्रतिष्ठित झालेली परप्रांतीय माणसे मुंबईत किती तरी आहेत. ती प्रतिष्ठित झाल्यानंतर आपल्या जातभाईंचीच सोय करतात. मुंबई आणि महाराष्ट्र यांचे रक्तशोषण करणाऱ्या या जळवा आहेत. त्यांचे निर्मूलन करण्यासाठी मुंबईत महाराष्ट्राने पोलादी राज्यकर्ते निर्माण केले पाहिजेत. पण हे कसे होईल याचा विचार करताना मती गुंग होऊन जाते !

मुंबई हे केवळ महाराष्ट्राचे नव्हे तर सगळ्या भारताचे औद्योगिक आणि आर्थिक केंद्र म्हणून गेली दोनशे वर्षे विकास पावत आहे. तेव्हा येथे मराठी लोकच सर्वत्र मोठे असावे अशी अपेक्षा करताच येत नाही. तशी कोणाची अपेक्षाही नाही. पण हे असे अखिल भारतीय केंद्र असल्यामुळे सगळ्या भारतातून हुशार, सुशिक्षित अशी निवडक माणसे येथे येतात आणि त्यांच्याशी मराठी लोकांना स्पर्धा करावी लागते. यामुळे मराठी माणसे मागे पडल्यासारखी दिसतात. खरे म्हणजे ही एक देवाची देणगीच समजली पाहिजे की, जगातली हुशार माणसे एका नगरात येतात आणि त्यांच्याशी मराठी लोकांना स्पर्धा करावी लागते. अशा स्पर्धेने मराठी माणसांची गुणवत्ता वाढू शकेल. पण तशी ती वाढायची असेल तर त्यासाठीही जाणीवपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत. बाहेरून येथे येणारी माणसेही आपल्या बुद्धीची आणि श्रमांची येथे पराकाष्ठा करीत असतात. हे गुण त्यांच्याकडून आपण घेतले पाहिजेत. पण मराठी लोकांना पुढे आणावे अशी इच्छा बाळगणाऱ्या वरिष्ठ पातळीवरच्या मराठी लोकांना याबाबतीत वाईट अनुभव येतो. मराठी लोक नुसते बोलके आहेत; त्यांना स्वतःचे अधिकार कळतात. पण आपली जबाबदारी कळत नाही, अशी तक्रार हे लोक करीत असतात. तेव्हा आपले हक्क समजावून घेऊन त्यांच्यासाठीच भांडणे करीत रहाण्याचा जहालपणा मराठी लोकांना नडतो ही गोष्टही आपण लक्षात घेण्याची गरज आहे. कारण मुंबईसारख्या औद्योगिक केंद्रात जी स्पर्धा आहे तेथे टिकाव लागण्यासाठी शेवटी आपली गुणवत्ताही स्पर्धेने वाढविण्याची महत्त्वाकांक्षा मराठी माणसात निर्माण केली पाहिजे.

## दूरदृष्टीने करावयाची कामे

मराठी माणूस मार खातो आहे तो मुख्यतः मुंबईसारख्या औद्योगिक केंद्र बनलेल्या शहरात. खेड्यापाड्यांचे स्वरूप पालटत आहे आणि ते महाराष्ट्रात अधिक पालटत आहे. ग्रामीण विभागाचा महाराष्ट्रात जो हा विकास होत आहे त्यामुळे महाराष्ट्रातून मुंबईकडे येणारा माणसांचा लोंढा तुलनेने कमी आहे. पण दक्षिणेला केरळ, आंध्र, मद्रास आणि उत्तरेकडे उत्तर प्रदेश, बिहार या ठिकाणाहून हा लोंढा येतच रहाणार आहे. तेव्हा मुंबईमधील ही स्पर्धा अशीच रहाणार आहे. आणि त्यामुळे मुंबईत मराठी लोकांचा टिकाव लागायचा असेल तर त्यांची सुखासीन वृत्ती, अल्पसंतुष्टपणा, आळस, खोट्या प्रतिष्ठेच्या कल्पना यांचा प्रथम निचरा केला पाहिजे. मराठी माणूस हा महत्त्वाकांक्षी, उद्योगी, धाडसी आणि दूरदृष्टीचा झाला पाहिजे. त्याच्या ठिकाणी स्वाभिमान हा खऱ्या अर्थाने निर्माण केला पाहिजे. आपल्या लोकांबद्दल त्याला प्रेम वाटले पाहिजे. आणि आपल्या लोकांना पुढे आणण्यासाठी झटणारी माणसे आणि संस्था येथे निर्माण झाल्या पाहिजेत. ही जिद्द मराठी माणसात निर्माण केली तर मराठी माणूस मार खाणार नाही. आज तो एकीकडे मार खातो आहे आणि दुसरीकडे त्याला खोट्या अहंकाराने ग्रासले आहे. आणि म्हणून मराठी माणसाचे दोष दाखवून त्याचे पाय मागे ओढू नका, असाही गिल्ला करण्यात येतो. पण मराठी माणसांचे दोष दाखवून ते दूर करण्याचे सामुदायिक प्रयत्न जर झाले नाहीत तर खोटा अहंकार पांघरून बसलेल्या मराठी माणसाला मुंबईत आणि अशाच तऱ्हेने वाढणाऱ्या महाराष्ट्रातल्या इतर शहरातही मार खातच रहावे लागेल. ●●●

[ पृष्ठ ६१ वरून – दीपमाला ]

सूचन असते. ग्रेस असतो. औचित्यविचार असतो. शय्यागृहातले सारे अनुभव सुंदर आणि कलात्मक असूनही साहित्यात येऊ शकणार नाहीत ही जाण कला घेऊन येते. ते तिचे भूषणच मानले जाईल असे वाटते. साहित्यात अंगभूत सौंदर्य असते ते ह्या अपरिहार्यपणे येणाऱ्या संयमाचे; सूचनाचे, औचित्यविचाराचे! आज हे नाकारले जात आहे. म्हणून वाद होतो. असुंदराला सुंदर करून समाजमानसाला उन्नत करणे ही तर साहित्याची प्रतिज्ञा असते. वाईट अनुभव कलावंताच्या कलात्मक स्पर्शाने चांगला होऊन येतो. पण ह्या चांगल्याची जाणीवपूर्वक ( काहीशी टूम म्हणूनही ) मोडतोड करण्याचे प्रयत्न जेव्हा होतात, त्या मोडतोडीचेच जेव्हा महान, क्रांतिकारक, दिव्य वगैरे शब्दांनी कौतुक केले जाते-प्रतिष्ठा दिली जाते तेव्हा ह्या 'स्वातंत्र्या'ची चर्चा होते. लेखकाचे स्वातंत्र्य हे रक्षणीय, आदरणीय गोष्ट आहे हे खरे असले तरी ती आदरणीयता, रक्षणीयता, जपणे, राखणे हे लेखकांचेच कर्तव्य आहे. त्यादृष्टीने विचार करता स्वातंत्र्य संकोच ही गोष्ट स्वागतार्ह नसली तरी स्वातंत्र्याची योग्य जाणीव व योग्य उपयोग ही गोष्ट तितकीच आवश्यक वाटते. शय्यागारे जर चव्हाट्यावर आली आणि शरीरशास्त्रातले सारे तपशील जर नटूनथटून साहित्याच्या मंदिरात मिरवू लागले तर स्वातंत्र्य हे 'स्व-तंत्र' राहणार नाही. त्याला स्वैराचाराचे रूप येईल. स्वातंत्र्याचा जयजयकार करणारांनी हा धोका आपण होऊन जाणला पाहिजे. तो जाणला तरच साहित्याचे क्षेत्र सुंदर राहील, निर्मळ राहील, कलात्म राहील.

**—सारस्वत**

अनुक्रमणिका








## सीमा पेटल्या आहेत, सावध ! !

गेले काही महिने आसाम, पश्चिम बंगाल, नागालॅण्ड, मिझो टेकड्या, नक्षलवारी ह्या भागातून येणाऱ्या वार्ता कुणाही राष्ट्रवादी माणसाला अस्वस्थ करतील अशाच आहेत. तात्पुरत्या फायद्याच्या व क्षणिक 'हिरॉइझम्'च्या आहारी जाऊन घेतलेले 'राष्ट्रीय' निर्णय हे अखेर राष्ट्राच्या अस्तित्वालाच कसे चूड लावून जातात ह्याचे एकमेव उत्तर म्हणजे भारताची फाळणी व भारत-पाकची निर्मिती होय असे आज ठामपणे, खंबीरपणे (व गंभीरपणेही) म्हणण्याची वेळ आली आहे असे वाटते. फाळणीने हिंदू मुसलमानाचा प्रश्न सुटेल वा संपेल ही कल्पना खोटी ठरली आहे. उलट फाळणी पत्करून आम्ही प्रश्नोपप्रश्न उपस्थित करून ठेवले आहेत. आणि आज वीस वर्षांनंतरही आम्ही फाळणीचेच शिकार बनलेलो आहोत. अजूनही पाक मैत्रीसाठी 'सौदा' चालूच आहे. काश्मीर प्रश्न हे तर एक निमित्त आहे. काश्मीर देऊन पाक तृप्त होईल ही अपेक्षा व्यक्त करणे म्हणजे वांझेला हनुमंतासारखा तेजस्वी पुत्र होईल म्हणण्याइतके हास्यास्पद आहे. आजचे आमचे सारे राजकारण एका भयानक कोंडीत सापडलेले दिसते आहे. 'मुस्लिम मॅनिया'-तून पाकची निर्मिती झाली आणि अस्तनीतले निखारे सांभाळीत, त्यांना खूष करीत करीत आम्ही काळ कंठीत आहोत. पूर्व भारताची आजची सारी समस्या (नक्षलबारीसकट) ही पाक-निर्मितीचे फलित आहे. "भारताचे शत्रुत्व व भारत-विनाश" हे पाकचे ध्येयस्वप्न आहे. (जन्मापासून--जन्मच त्या कल्पनेतून झाला). त्यासाठी पाकने 'साहसवाद' आचरून पाहिला पण भारतीय सेनेने तो साहसवाद स्वतःच्या वैयक्तिक व सामुदायिक पराक्रमाने ठेचून काढला. पण त्यामुळे पाकीस्तानची धग संपली नाही. आग विझली नाही. आसाम, पश्चिम बंगाल, नागा, मिझो बंडखोर यांच्या माध्यमातून व चिनी सैतानाशी शय्यासोबत करून आता पाकने पूर्व भारत अशांत केला आहे. आसामच्या डोंगराळ भागातल्या लोकांची फेडरल राज्याची मागणी, नक्षलबारीतील शेतकऱ्यांचे निमित्त करून पण चीनचे सर्वांगीण सहाय्य घेऊन योजण्यात आलेला सशस्त्र उठाव, चिनी सहाय्याने चाललेले मिझो–नागा हल्ले. आसाममध्ये मुसलमान (पवित्र--तथाकथित) घुसखोरी व संख्येच्या बळावर आसाम गिळंकृत करण्याचे पद्धतशीर प्रयत्न ह्या साऱ्यातून आज सीमा अशांत व असुरक्षित झाल्या असल्याचेच दिसून येते. "कम्युनिस्ट चीनच्या मुक्तिसेनेचे आम्ही कलकत्त्यात स्वागत करू" असे ठामपणे म्हणणाऱ्या व आता उपमुख्यमंत्रीपदी विराजमान झालेल्या ज्योति बसू प्रभृतींच्याच राजवटीत 'नक्षलबारी'–सारखी बंडखोरी उद्भवू शकते. सहन केली जाऊ शकते. केंद्रिय हस्तक्षेप नाकारला जाऊ शकतो. शस्त्रबंदीचा हुकूम अन्याय्य आहे असे म्हटले जाऊ शकते. सैन्याला व पोलिसदलाला ती शस्त्रे आव्हान देऊ शकतात. "शो-डाऊन"ची भाषा निघू शकते. पार्लमेंटमधली माणसे पाहणीमंडळ पाठवू म्हणतात. राज्य नकार देते, केंद्रीय हस्तक्षेप नको म्हणतात. पण बंगालवरचे हे (चिनी) आक्रमण ही भारतपाक शत्रूत्वातून उत्पन्न होणाऱ्या व चिनी–पाकिस्तानी (नव्या) साहसवादाची नांदी आहे. मागील आक्रमण नेफाच्या डोंगरातून झाले. नवे आक्रमण पूर्वपाक व पश्चिम बंगालमधून येत आहे. चिनी मुक्तिसेनेचे अग्रदूत आज नक्षलबारीत भारताच्या एकात्मतेला व अस्तित्वालाच जणु चूड लावीत आहेत. आंताचे आक्रमण डोंगरी व पठारी भागातून असे वाट चालत आहे. नक्षलबारीच्या बंडाचे स्वरुप विद्यार्थी मोर्चे वा गोसंरक्षण विषयक मोर्चासारखे सामान्य व निरुपद्रवी नाही. शासनातून व शासनाबाहेरून राज्ययंत्रणा खिळखिळी करणे, अशांति माजविण्याच्या कम्युनिस्ट तंत्राचाच तो भाग आहे. आपल्या संरक्षणाचे दृष्टीने 'नक्षलबारी' हा एक आत्यंतिक महत्त्वाचा विषय आहे. दिल्ली, पेकिंग, नेपाळ, रंगून इत्यादि ठिकाणी एकाच वेळी घडलेल्या 'चिनी' घटना ह्या साऱ्यामागे व नक्षलबारीच्या सशस्त्र उठावामध्ये एक समान सूत्र आहे. चिनी-पाक युतीने हे एक नवे आव्हान उभे केले आहे. ह्या आव्हानांचे निर्माते आम्हीच आहोत. 'भावाची वाटणी' आणि "हिन्दी-चिनी भाई भाई" ह्या महान स्वप्नरंजनातूनच ह्या भयानक सत्याचा जन्म झाला आहे. आमचे संरक्षणमंत्री नुकतेच म्हणाले की, "आपल्या सीमा गंभीर धोक्यात आहेत." हा धोका आम्हाला एक नवे आव्हान देत आहेत. ह्या निमित्ताने आम्ही चीन-पाकबाबत काही वास्तववादी व वस्तुनिष्ठ भूमिका घेणार आहोत, की नाही हेच ते आव्हान आहे. चीनमध्ये भारतीय



राजदूतांची जी विटंबना झाली–करण्यात आली तिने आमच्या राष्ट्रीय अस्मितेचा अपमान झाला आहे असे आम्हास वाटत नाही काय? आपली सर्व उत्तरपूर्व सीमा आपल्यापासून नव्या धोरणाची अपेक्षा करीत आहे. एका स्वप्नरंजनाने १९६२–६५ साली आपल्याला दिलेले नवे वस्तुपाठ अजूनही आम्ही अपवादभूतच मानीत आहोत काय? अजूनही आम्ही निषेध खलित्यांच्या सामर्थ्यावरच विश्वास ठेवून आहोत. नक्षलबारी मार्गे येणारे व घरभेद्या (लाल) चळवळवाल्यांच्या सहाय्याने मुसंडी मारू इच्छिणारे हे लाल आक्रमणं आम्ही मोडून काढले नाही तर येणारा काळ आम्हाला क्षमा करणार नाही. 'पाक'च्या नापाक निर्मितीचे पाप आपण फेडलेच पाहिजे. पाक-चीनबाबत स्पष्ट भूमिका घेतली पाहिजे. कारण हा प्रश्न केवळ वंगालचा नाही, तर साऱ्या देशाच्या संरक्षणाचा–अस्तित्वाचा प्रश्न आहे.

## 'मनोहर'चा ४०० वा अंक

'किर्लोस्कर' मासिके ही मराठीतील वयोज्येष्ठ मासिके! 'किर्लोस्करां'च्या व्यापारी व व्यावसायिक प्रगतीची खबर देण्यासाठी 'किर्लोस्कर खबर' जन्मली. त्यानंतर स्त्री, मनोहर ही मासिके अवतरली. दोन्हीही मासिकांच्या खांद्यावर वेगवेगळे झेंडे होते. 'मनोहर' मासिक हे मुख्यतः 'वाङ्मयीन' हेतूने निघाले व गेल्या वर्षापर्यंत मनोहरचे 'वाङ्मयीन' स्वरूप कायम होते असे म्हणता येईल. पण वयाने वाढलेल्या मनोहरचा अचानकपणे कायाकल्प झाला. आणि मनोहर मासिक एकदम तरुणांचे लाडके मासिक झाले. जुलै महिन्याचा मनोहरचा अंक ४०० वा अंक म्हणून प्रसिद्ध झाला आहे. त्यानिमित्ताने "मागे वळोनि पाहता" हा सिंहावलोकनात्मक लेख आवश्यक होता. व बा. कृ. गलगली ह्या मनोहरशी सतत गेली कित्येक वर्षे सबंधित असलेल्या माणसान घेतलेला आहे. त्यात हे म्हणतात की महाराष्ट्र काय किंवा अन्य प्रांतात काय एखादे मासिक सतत ४०० महिने चालू राहणे आणि तेही एका विशिष्ट ध्येय धोरणाने चालू राहणे ही गोष्ट आजच्या बिकट परिस्थितीत तरी फार कठिण. 'मनोहर'ने हे सातत्य टिकवून धरले आहे ही आनंदाची गोष्ट !

आजचे मनोहरचे स्वरुप हे नव्या पिढीच्या मित्र–मार्गदर्शक स्नेह्याचे आहे. तरुणांचा 'मनोहर' लाडका होत आहे. मनोहर 'ताजे' आहे, ह्याचे हेच गमक ! तेजस्वी प्रतिभेचे व तारुण्याचे अनेक उन्मेष ४०० व्या अंकात पहायला मिळतात. अंक कल्पकतेचा, प्रयत्नाचा स्पर्श घेऊन आला आहे. त्यातल्या लेखांचे मूल्यमापन करीत नाही. भरगच्च व वैशिष्टचपूर्ण अंक दिल्याबद्दल संपादक श्री. मुकुंदराव किर्लोस्कर यांचे व अन्य संपादकीय मंडळीचे अभिनंदन करतो.

## लेखकांचे (लेखन) स्वातंत्र्य

तसा विषय जुनाच. पण पुन्हा पुन्हा नव्याने पुढे येणारा, नव्याने रंगणारा (क्वचित तापणाराही). वास्तविक पाहता कुणी काय लिहावे, कुणी कसले चित्र काढावे, कुणी कसली मूर्ति करावी, कुणी कुठला राग आळवावा, कुणी कसले सूर आळवावे, कुणी कुठला ताल धरावा हे ठरविणारे तुम्ही आम्ही कोण? कलेची निर्मिती हे 'व्यक्तिधन' आहे. ती "स्वान्तः सुखाय" होत असते वगैरे गोष्टी नवीन नाहीत. मूलभूत विचार म्हणून त्या मांडल्या गेल्या आहेत—मानल्याही गेल्या आहेत. मग वारंवार वाद कां होतात? लेखकांचे–कलावंतांचे हे स्वातंत्र्य वारंवार धोक्यात आणण्याचे प्रयत्न कां होतात? मग त्यांची वकिली करण्यासाठी लेखणी (वाणी) झिजविण्याचे प्रयत्न कां करावे लागतात? कामगार संघटनांप्रमाणे ते स्वातंत्र्य रक्षिण्यासाठी संघटना कां निर्माण कराव्या लागतात? खटले भरले जातात आणि त्या खटल्यांना विरोधही केला जातो तो कां? कला अनिर्बंध असाव्या की त्यांनाही काही बंधने असावीत? ती बंधने सामाजिक असावीत, शासकीय असावीत, की वैयक्तिक? सामाजिक वा शासकीय बंधने ठरवायची कुणी? साहित्यविषयक संस्थांनी, त्यातल्या त्या वेळच्या (बदलणाऱ्या) पदाधिकाऱ्यांनी की एखाद्या शिपाई–फौजदाराने? आज ह्या मागणीला पुन्हा उधाण आले आहे. नव्या पिढीतील काही लेखकांनी लिहिलेल्या काही कथाकादंबऱ्या विवाद्य ठरल्या. श्लील अश्लीलतेच्या संदर्भातही चर्चा झाली. काही अशिष्ट शब्दांबाबत आक्षेप घेण्यात आले आहेत. मराठी वाङ्मयात हे व असेच लिहिणे हे क्रांतिकारक (व म्हणून अनुकरणीय) ठरू लागले. त्यावर प्रखर टीका झाल्या म्हणून लेखनस्वातंत्र्याची नव्याने वकिली सुरू झाली आहे. ती वकिली अयोग्य आहे असे म्हणावयाचे नाही. लेखकाला लेखनातून आपले भावानुभव व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य असावे असेच आम्हीही मानतो. ते अनुभव ही 'वैयक्तिक' ठेव असल्याने ते व्यक्त होत असताना स्वतःचे वेगळे व स्वतंत्र (वैयक्तिकही) रूप घेऊन व्यक्त होणार हेही समजते. पण कला निर्मिती 'वैयक्तिक' बाब असली तरी ती व्यक्त होते अखेर रसिकांसाठी, वाचकांसाठी– मी सोडून दुसऱ्या बहुतांसाठी! तो लेखक–रसिक संवाद असतो. त्यामुळेच निर्मिती केवळ वैयक्तिक रहात नाही. तिला नकळत एक सामाजिक अधिष्ठान प्राप्त होत असते. लेखन कुणासाठी तरी होत असते. आणि म्हणूनच ते स्वतंत्र व वैयक्तिक असले तरी ते मर्यादित अर्थानेच खरे आहे. लेखकावर हे सामाजिक दायित्व येते ते त्यामुळेच! आणि ते दायित्व फारच ताणले जाते तेव्हा ताण उत्पन्न होतो. त्यातून असल्या दायित्वशून्य लेखनावर टीका होत राहते. कलेला काही एक अंगभूत सौंदर्य आहे. कलेत काही अपरिहार्यता असते.

[पृष्ठ ५९ वर]

# “गंधर्व” न अमुचे गेले
# “गंधर्व”च गातचि बसले

नटसम्राट बालगंधर्व गेले. एक स्वर्गीय आवाज मूक झाला. एक रुपेरी रूप घेऊन आलेले, मराठी रंगदेवतेची पूजा बांधणारे सुंदर स्वप्न विरले. मराठी रंगभूमीचा एक महान शिल्पकार हरपला. सुवर्णयुगाचा युगकर्ता महापुरुष काळाच्या पडद्याआड गेला. लाखो श्रोते–प्रेक्षकांच्या हृदयाचा अनभिषिक्त सम्राट म्हणून गेली साठ वर्षे अधिराज्य गाजविणारा ‘गंधर्व’ देवाघरी गेला. घराघरातून नाट्यसंगीताचे अमृतकुंभ पोहचविणारा, मराठी मने संगीतप्रेमी करणारा, आपल्या गानाभिनयाने त्यांचे रंजन करणारा रसिकराज ‘गंधर्व’ संपला. महाराष्ट्राचा लाडका तारणहार मानला गेलेला ‘बालगंधर्व’ अखेर संपला. गंधर्व आहेत आणि गंधर्व गेले. रंगभूमीच्या इतिहासातले एक सुवर्णपान गळून पडले. त्या पानापानावर फक्त रेखाटले आहेत स्वर्गीय सूर, नोंदली गेली आहे असामान्य लय, रेखाटले गेले आहेत हजारो “वन्समोअर,” मानाचे मुजरे, द्रव्याचे आकडे, शालूपैठण्यांचे, अत्तरांचे हिशेब, बादशाही खर्च, मानवी ऋजुता, त्या महान स्वप्निल रात्री, ते दौरे, भजनांचे कार्यक्रम, त्या मैफली, खास लोकाग्रहास्तव वाढलेले मुक्काम, लावलेली नाटके, ते मानसन्मान आणि मग शेवटी शेवटी रेखाटले गेले आहेत गोहरबाईंचा मृत्यु, गाण्याच्या बैठकीत तास दोन तास सुरांशी धडपड करूनही आवाज लागत नाही असे प्रसंग! अशाही काळात पंगु झालेले गंधर्व लोकांच्या आधाराने येऊन बसत आणि गात. पण आवाज साथ करीत नसे. एकेप्रसंगी ते म्हणाले “देवा, मी पंगु झालो, विकल झालो तरीही मला कधी मरावेसे वाटले नाही. आता माझा आवाज माझी साथ करीत नाही. आता मात्र मला मरावेसे वाटते.” आवाजाविना गंधर्व कसला? बालगंधर्व सुरांना परब्रह्म मानीत होते म्हणूनच हे उद्‌गार त्यांच्या तोंडून निघाले. ‘बालगंधर्व’ ही युगायुगातून त्या त्या समाजाला लाभणारी अमृतवल्ली होय. गंधर्वांनी जे यश मिळविले त्यात त्यांची अविचल निष्ठा, श्रद्धा हीच मला अधिक महत्त्वाची वाटते. ही निष्ठा, ही सुरांची सच्चाई लोकमान्यांसारख्या द्रष्टया पुरुषाने ओळखली असली पाहिजे. अन्यथा राजकारणात गढलेल्या त्या महापुरुषाच्या तोंडून “हा तर ‘बालगंधर्व’ आहे” असे उद्‌गार निघते ना! त्या महापुरुषाने रंगभूमीवर पुढे महापुरुष, युगनिर्माता ठरणाऱ्या ह्या महापुरुषाची जात ओळखली आणि हे लेणे “बालगंधर्व” म्हणून महाराष्ट्राला प्रदान केले. मला असे वाटते की, लोकमान्य आणि बालगंधर्व ह्या दोघांच्याही आयुष्यातला तो ‘सुवर्णक्षण’ असला पाहिजे.

बालगंधर्वांच्या वैभवकालातला व नंतरच्या गोहरबाईसमवेत दादरच्या श्रीनंद नाट्यगृहात त्यांनी उभ्या केलेल्या गंधर्व नाटक मंडळीचा नाट्यसंसारही मी पाहिला. आणि साहित्यसंघाच्या नाट्योत्सवात खास लोकाग्रहास्तव त्यांनी पांचवारी साडी नेसून आणि विंगच्या आधारा आधाराने उभे रहात सादर केलेली रुक्मिणीही पाहिली. त्यांच्या अभंगांचे खाजगी कार्यक्रमही ऐकले. गंधर्व नाटक मंडळीचा खरा-



खुरा मखमालीचा पडदाही पाहिला आणि चार जणांनी उचलून आणून बसविलेले बालगंधर्वही पाहिले. पण मराठी माणसांनी मात्र ह्या माणसाला सतत मानाचा मुजराच केला, असे मला वाटते. थकलेल्या शरीरात, सूर, ताल, लयीचे अधिराज्य वसत होते, तोपर्यंत ‘बालगंधर्व’ हे ‘रूपेरी स्वप्न’ कधी भंगले नाही. गात्रागात्रातून स्रवत होते सूर आणि सूरच! कारण गंधर्व ही व्यक्ति नव्हती ते होते सूर! ती होती लय, तो होता ताल. त्यानेच सावरला तोल किर्लोस्कर नाटक मंडळीचा! दिली शान गंधर्व नाटक मंडळीला. घडविला महान इतिहास मराठी रंगभूमीचा ! दिले एक महान युग मराठी नाटकाला. आणि आता ते शिल्प काळाने गिळले आहे. गंधर्वांना परमेश्वराने अनंत हस्ते अनंत शक्ति दिल्या. त्या शक्तीची यथार्थ जाणीव गंधर्वांना होती. म्हणूनच निष्ठेने त्यांनी त्या साऱ्या शक्ति रंगभूमीच्या कारणी लावल्या. दारूमुळे ‘गंधर्वां’चे सूरच बेसूर होण्याची शक्यता आहे हे ध्यानी येताच त्यांनी दारु सोडली ती कायमची ! गंधर्वांनी संगीतात संकेतांची मोडतोड केली. पण त्या गळ्यातून निघणारे सूर इतके मृदु, मधाळ होऊन येत की, ती मोडतोड पटत नसूनही जाणकारांच्या मुखातून शब्द निघत “वाहव्वा!” भास्करबुवा बखले, नाट्याचार्य खाडिलकर, गोविंदराव टेंबे ह्यासारखे गुरु लाभले. त्यांनी गंधर्वांचे लेणे महाराष्ट्राला दिले. गंधर्वांचे गाणे हे खास गंधर्वांचे गाणे होते. त्या गाण्यात लाडिकता होती, असामान्य गोडवा होता, सुरांची सच्चाई होती. गंधर्वांचे अनुकरण अनेक गायक–गायिकांनी केलं. पण गंधर्वांच्या प्रतिमेला धक्का लावण्याचे सामर्थ्य त्यात नव्हते. गुजराथी, पारशी यांनीही ह्या नटसम्राटाच्या गान–अभिनयाला दंडवत घातलेले मी पाहिले आहेत. गंधर्व ही फार मोठी शक्ति होती. ते एक महान पर्व होते. वैभवकाळाचे अनेक साक्षीदार आज सांगतील की हा माणूस “राजा”सारखा रंगमंचावर वावरला. एका पुरुषाने स्त्रीला ‘स्त्रीत्व’ शिकवावे ही गोष्ट अतर्क्य वाटते. पण गंधर्वांपासून तत्कालीन स्त्रियांनी अनेक ‘पाठ’ घेतले ही वस्तुस्थिति आहे. खाडिलकरांनी ‘गंधर्वा-

[ पृष्ठ ६४ वर पहा ]








# दोन सोव्हिएट चित्रपट

**जूनच्या** तिसऱ्या आठवड्यात मुंबईत सोव्हिएत चित्रपट महोत्सव पार पडला. या महोत्सवात गेल्या पांच ते सात वर्षातील एकूण सात चित्रपट दाखविण्यात आले. मात्र प्रत्येक चित्रपटाबरोबर प्रारंभीच सोव्हिएट 'सर्कस'वरील अनुबोधपटही दाखविण्यात येत असे. ज्यानी ज्यानी हा चित्रपट महोत्सव पाहिला त्याना एक मोठी चित्रपट मेजवानीच मिळाली असे म्हणता येईल. सोव्हिएट चित्रपट तंत्राच्या अभ्यासूला व चित्रपट समीक्षकाला या चित्रपटांच्या सूक्ष्म अवलोकनातून अनेक प्रकारचे उद्‌बोधक ज्ञान झाल्यावांचून राहिले नाही...

यापैकी केवळ दोन कलापूर्ण चित्रपटांचा मी येथे काहीसा मर्यादित परिचय चित्रपट प्रेमिकाना करून देत आहे...

पहिल्या चित्रपटाचे नांव आहे 'सर्‌योझा' (Seryoza) . बिनरंगाचा नेहमी-सारखाच परंतु विशाल चित्रपटावर प्रदर्शित केलेला हा चित्रपट स्मृतीत खोल खोल रुतून बसतो; तो प्रेक्षकाच्या अनुभवविश्वाचा एक अविभाज्य भागच बनतो म्हणाना... जॉर्जी दानोलिआ आणि इगॉर ताळान्कीन यानी दिग्दर्शित केलेल्या या चित्रपटात रशियाचा या जमान्याचा विख्यात नट सर्जी बोन्डारचुक् आणि अभिनेत्री इरीना स्कोब्‌स्तेवा काम करतात; 'सर्‌योझा' ची भूमिका सातआठ वर्षाच्या लेशा लोत्‌झेन्को या मुलाने केली आहे. एका टीकाकाराने या चित्रपटाबद्दल म्हटले आहे की हा चित्रपट म्हणजे रजतपटावरील एक कडूगोड, विषण्णतेनें भरलेले अमरगीतच आहे...

अवघ्या दीड पावणेदोन तासाच्या या चित्रपटात लेखक दिग्दर्शक व अभिनेत्यानी मिळून अतिकोमल वयातील अतितरल संवेदनाक्षम मुलाच्या अंतर्मनाचा अचूक वेध घेतला आहे. हा मुलगा रडतो तेव्हा आपणही रडतो; तो हसतो तेव्हा आपल्याही आनंदाचे मनस्वी असे भरते येते. आपल्याला आपलं बाळपण आठवतं व आता जीवनौघात मरून थिजून गेलेल्या त्यावेळच्या वात्यविव्हल संवेदनाही (कदाचित) जाणवतात... सोव्हिएट लेखिका व्हेरा पॅनोव्हा हिच्या "सर्‌योझा" या भावसुंदर कथेवरच हा चित्रपट आधारला आहे. दक्षिण रशियात एका अतिदूरच्या आडवळणी शहरात राहणारा बालक म्हणजे हा 'सर्‌योझा'. कुटुंबातील एकुलता एक मुलगा. त्याच्या तरुण सुंदर आईने दुसरे लग्न केलेले असते.... संध्याकाळी आपल्या बिछान्यात पडावं, सुंदर स्वप्ने पहावीत, सायंनिर्मित कल्पनासृष्टीत वावरावं हा 'सर्‌योझा'चा स्वाभाविक जीवनक्रम. सावत्र बाप खरा; पण प्रेमळ ! तरीपण 'सर्‌योझा'ला सभोवातलचं वास्तव जीवन मोठं गुंतागुंतीचं वाटतं. मध्यरात्रीच तो बिछान्यात जागा होतो तर कुणी जवळ

## चांदण्यांचे जग

नसतं. उठून आईच्या शोधात तो जातो तर आई बराच वेळ दार उघडीत नाही... आई दरवेळी त्याला दटावते; चूप करते; 'देवासारखा निमूट बस' असा सारखा तगादा लावते. आणखी एक घटना घडते... एके दिवशी आई हॉस्पिटलमधून येते ती एका इवल्याशा पण ओबडधोबड जीवाला घेऊन... ही काय आफत !... न बोलणारा, न चालणारा, न खेळणारा कोण हा ?....कशासाठी आला आहे ?.. आई सगळं लक्ष त्याच्याचकडे देते.. आता पुढे कसं ?... 'सर्‌योझा'च्या चिमण्या मनात चिमुकल्या झऱ्याला नाना इवली इवली वळणे मिळावी तशी वळणे फुटतात. ते पोर भांबावून जातं !... त्यांचे त्याच्याच वयाचे शेजारी पाजारी मित्र व मैत्रिणी असतात... 'सर्‌योझा'ला त्याचा बाप एक दुचाकी आणून देतो.. मग केवढी धमाल !... गावात एकदा एक बोटीचा कॅप्टन येतो, त्याचा पुतण्या नेहमी दादागिरी करतो पण 'सर्‌योझा'ला संभाळून घेतो... सगळे जण या खलाशी काकाबरोबर ओढ्यावर आंघोळीसाठी जातात.. एका कोंडीत डुंबतात; हा खलाशी काका मोठा गंमत्या, खेळाडू असतो. सगळे कपडे बाजूला काढून ठेवून सरळ उघडाबंब तो पाण्यात उडी घेतो.. आणि त्याच्या कातडीवर सगळीकडे हिरवं निळं गोंदलेलं असतं ! अरे बापरे ! किती त्या नागड्या बाया.. किती तऱ्हेचे साप.. मांजरी कुत्रं सुद्धा... आणखीही खूप मजेमजेची चित्रे !... झालं !... 'सर्‌योझा'चे दोस्तही चोरून गोंदून घेतात आणि 'सर्‌योझा' आजारी पडतो. . किती म्हणून आपले हे मजेचे दिवस फुकट जाताहेत !.. शी.. शी... 'सर्‌योझा'ला आजार अगदी असह्य होतो..

आणि तितक्यातच त्याच्या बापाची बदली होते... दूर बर्फाच्या प्रदेशात...तो एक शेतीविकास अधिकारी असतो.. आता बिऱ्हाड बदलायचं ! पण 'सर्‌योझा'ची आई म्हणते.... "सरूला आपण इथेच ठेवू ! आजीबरोबर... त्याला कशाला इतक्या दूर !"... 'सर्‌योझा' सगळं ऐकत असतो; बापही दुजोरा देतो. प्रत्यक्ष जायचा दिवस आला.. ट्रक भरला.. बाप व आई ट्रकमध्ये (छबकड्याला घेऊन) बसली.. सकाळपासून सर्‌योझाचा चेहरा उतरलेला... नूर पालटलेला...हूं नाही की चूं नाही.. ट्रक हालतो; बापच चालवतो आहे... 'सर्‌योझा' एकदम पाठ फिरवतो, अबोलसा होऊन... इवलीशी ती त्याची पावले जड जड होतात.. घराच्या दिशेने पडलेली... आणि खाडकन् कर्कश आवाजात ट्रकला ब्रेक लागतो....."सरू... सर्‌योझा.. थांब; मी येतो आहे... चल, तयारी कर... तूही आमच्याबरोबरच येतो आहेस... माझ्या सरू..." सर्‌योझाचा बाप धावतच जातो.. आणि सरु तोंड वळवून म्हटला तर हसतो, म्हटला तर रडतो... चित्रपट इथेच संपतो.

मुख्य पात्रे अवघी तीनच ! आईला आपल्या मुलाच्या संवेदनाच समजून घेता येत नाहीत !...संसारातला हा आपला



अनुक्रमणिका

नेहमीचाच अनुभव नाही का?... 'सर्-योझा'ची भूमिका त्या इवल्याशा मुलाकडून किती कौशल्याने करून घेण्यात आली आहे.. कॅमेरा सारखा त्याच्यावरच खिळून रहातो... त्याच्या मनातील नाजूक व सूक्ष्म भावांची आंदोलने कॅमेऱ्या-मधून हळूवारपणे टिपली गेली आहेत... मिखेल लर्मॉन्टोव्ह या थोर रशियन लेखकाच्या शब्दात सांगायचे म्हणजे 'It is as pure and fresh as the kiss of a child..' (बालकाच्या चुंबनासारखीच ही कलाकृती निर्मळ व निरागस अशी आहे..) पडद्यावर सारखा छायाप्रकाशाचा मनोज्ञ खेळ चाललेला असतो. मुलांची मनं किती किती कोवळी व प्रौढांची (आईचे सुद्धा) मने कशी जून व जड़ झालेली असतात, याचं गीत म्हणजे हा चित्रपट! अवश्य पहावा.. पुनः पुनः पहावा असा!...

दुसरा चित्रपट रंगीत आहे. असे रंग! डोळ्यांना, मनाला, बुद्धीला व कल्पकतेला सतेज करणारे; रंग, रूप, रसागंधात डुंबवून व बुडवून टाकणारे.. रशियाचा महाकवी पुष्कीन याच्या 'Shot' (बंदुकीचा आवाज) या विख्यात कथेवर आधारलेला. परंतु मूळ कथेबरोबरच पुष्कीनच्या इतर काही कथांचाही त्यात समावेश केलेला आहे. हा चित्रपट आपल्याला थेट झारशाहीच्या काळांत व व अद्भुतरम्य भावसृष्टीत घेऊन जातो. प्रॉस् फिल्म स्टुडियोत तयार झालेल्या या चित्रपटपटाची कथा एन्. कोवारस्की यानी लिहिली आहे. दिग्दर्शन एन्. त्राख्ते-न्बर्ग यांचे. यूरी याकोव्हलेव, मिखिल कोझॅकोव्ह हे प्रमुख नट... एस्. शैनिन् यांचा कॅमेरा.

'आम्ही एक द्वन्द्वयुद्ध खेळलो...' हे या कथेचं मध्यवर्ती मुख्य सूत्र. हा अगदी अलिकडचा रशियन चित्रपट. चित्रपटात बंदुकीने (पिस्तूलांनी) खेळलेली कितीतरी द्वन्द्वयुद्धे आहेत... जणु सगळा चित्रपट बंदुकीच्या नळीतूनच चित्रित झाला असावा! शेवटची बंदुकीची गोळी मात्र नायकाचाच प्राण घेते!... ही एक विलक्षण चटका लावणारी शोकांतिका आहे. हा संपूर्ण चित्रपट या कथेतील हृद्य नाट्यगुणांचा विकास करण्याच्या दृष्टीनेच तयार करण्यात आला आहे. नाट्यप्रवानता हीच त्याची स्थायी बैठक! संयम हा त्याचा आत्मा!. प्राणच!... कुठे भडकपणाला एवढासाही वाव दिलेला नाही... दोन सव्वादोन तासाची ही पडद्यावरील नाट्यकृती प्रेक्षकाला भारून टाकते... झपाटते.

सिल्व्हीयो हा या कथेचा नायक. एका काऊण्टकडून एका लष्करी क्लबात त्याचा अपमान केला जातो. तो त्याला द्वन्द्व-युद्धाचे आव्हान देतो. हे एक प्रकारचे तत्कालीन समाजातील नैतिक युद्ध आहे... उच्च व नीच समाजश्रेणीतील दोन मानी पुरुषांमधील. हा अपमान सिल्व्हीयोला सारखा छळीत असतो... गिळीत पण असतो. परंतु प्रत्यक्ष जेव्हा सूडाचा प्रसंग येतो तेव्हा सिल्व्हीयोतील माणुसकी जागृत होते... तो आपले पिस्तूल गुंडाळून घेतो... व ग्रीस देशाच्या स्वातंत्र्यलढ्यात भाग घेऊन तुर्कांविरूद्ध लढतो. पराक्रम करतो व गोळी लागून मरतो... मरता मरता त्याला अनेक बंदूकीतून निघालेल्या गोळ्यांची चित्रे दिसतात... आणि आठवतो तो त्याने काउण्टवर झाडलेला पहिला 'शॉट'... 'फ्लॅशबॅक्' शैलीने हा संपूर्ण चित्रपट चित्रित झाला आहे. यात एकच स्त्री-पात्र आहे... काऊण्टेस्... थोडाच वेळ येणारं; लक्ष वेधणारं!

स्वतः दिग्दर्शक या चित्रपटाबद्दल म्हणतात... 'आम्ही या कथेतील नायकाची विकासक्षम नैतिक उंची दाखविण्याचा प्रयत्न केला आहे; प्रत्येक पिढी आपापल्या भाषेतील अक्षर-वाङ्मयाचा नवा नवा अर्थ लावण्यासाठी झटत असते... हा एक तसाच नवा शोध घेण्याचा आमचा वेगळा खटाटोप आहे....'

आणि खरोखरच हा त्यांचा खटाटोप यशस्वी झाल्याचा प्रत्यय चोखंदळ चित्रपट रसिकाला सारखा येत रहातो!.. रशियन जीवनातील कोणत्या तरी जुन्या नव्या जीवन-मूल्यांचा संघर्ष व संकर त्याला अनुभवता येतो व मानवी स्वभावाचा चिरंतन साक्षात्कार त्याला चित्रपटासारख्या कलेच्या प्रभावी व सर्जनशील माध्यमातून होतच रहातो.. असे हे यंदाच्या सोव्हिएत चित्रपट महोत्सवातील दोन अवीट व अविस्मरणीय अक्षर चित्रपट!

**—प्रभाकर श्रीधर नेरुरकर**

---

[पृष्ठ ६२ वरून]

**साठी' नाटके लिहिली ही गोष्ट गंधर्वांचे मोठेपण स्वयंभूपणे सिद्ध करणारी आहे. शास्त्रीय संगीत लोकप्रिय करून घराघरातून पोहचविण्याची महान कामगिरी गंधर्वयुगाने केली आहे. सुधीर फडके यांच्या सारखा आजचा संगीत दिग्दर्शक गंधर्व युगाचे ऋण मानतो. त्यांना गुरुपद बहाल करताना दिसतो तेव्हा गंधर्वांचे मोठेपण मराठी जनमानसात किती खोलवर रुजले आहे ते ध्यानी येते.**

**गंधर्वांच्या गान—अभिनयाबद्दल खूप लिहिता बोलता येण्यासारखं आहे. तल्लीन, तन्मय होऊन जाण्याचा फार महान गुण गंधर्वांत होता. गंधर्वांचे सारे जीवन हीच मुळी एक महान तपस्या होती. गंधर्व सुरांचे मिशन घेऊन इथे आले होते. "अवघाची संसार" हा गंधर्वांचा एक फार आवडता अभंग होता. त्यांच्या आयुष्याचीच जणु ती प्रतिज्ञा होती. ती प्रतिज्ञा त्यांनी आजन्म पाळली. अविचल श्रद्धेने पाळली. आणि अवघा संसार सुखाचा करीत करीत, सुरांची संपत्ति उधळीत उधळीत, असंख्य स्मृतींचा गुलाल उधळीत उधळीत, तोंडाने, 'देवा, आता आम्ही जातो अमुच्या गावा, अमुचा रामराम घ्यावा' म्हणत म्हणत महाराष्ट्राचा हा लाडका लाल 'बालगंधर्व' आता स्वर्लोकी निघून गेला आहे. शरीर विरले. उरली रक्षा. त्या रक्षेच्या कणाकणातून आजही ऐकू येतील तेच सूर———**

**अवघाची संसार सुखाचा करीन**<br>
**आनंदे भरीन तीन्ही लोक......**<br>
**बालगंधर्वांच्या स्मृतीला अभिवादन!!**

**—संपादक**










# पुन्हा एकदा लेकुरे

**उदंड** जाली ! होऊ नयेत असं (बऱ्याच जणांना व सरकारलाही) वाटत असूनही जाली. नाटके उदंड होतात. पण चांगली, पुन्हा पुन्हा पहावीशी वाटणारी, पुन्हा पाहूनही नवी, ताजी वाटणारी नाटके उदंड होतातच असे नाही. नाटके सादर करणारा माझा एक निर्माता-दिग्दर्शक मित्र परवा मला भेटला. सांगत होता "यंदा वीस नवीन नाटके वाचली. सारी परत केली. संस्कार करून त्यातली एक दोनच बरी होण्यासारखी होती. पण फार संस्कार करावे लागले असते. तेवढा वेळ नव्हता." आता बोला, नाटके उदंड होताहेत ह्याचा हा फक्त 'एक'(च) अनुभव ! बाकीचे नाटच दिग्दर्शकही हेच सांगतील. नाटकांची वाण नाही. त्यांची वीण वाढतेच आहे. पण चांगली नाटके, 'रिपीट व्हॅल्यू'ची नाटके कमी मिळतात. अशा कमी असलेल्या नाटकात मग प्रा. वसंतराव कानेटकरांची अलिकडची सारीच नाटके मोठ्या डौलाने मानाचे मुजरे घेताना दिसतात. "रायगडाला जेव्हा जाग येते" ह्या नाटकाने सारे विक्रम सिद्ध केले. पण आज मत्स्यगंधा, लेकुरे उदंड जाली, अश्रूंची झाली फुले ही नाटकेही आपली 'रिपीट व्हॅल्यू' सिद्ध करून बसली आहेत. घरी लेकुरे उदंड नको असली वा सरकारी सवलती मिळणार नाहीत म्हणून आपण 'नको नको' म्हणत असलो तरी उदंड लेकरांना मात्र सरकारी दंडुका ठाऊक नाही. तिथे प्रेक्षक गोळा होतात राजा-राणीशी बोलतात. डॉक्टर अष्टपुत्रे त्याना रिझवितो. घटिंगण गुरुजी (तसा) घटिंगण वाटत नाही. एकच घटिंगणपणा तो करतो. तो त्याच्या (घोतराच्या) अंगलट येतो. सिने दिग्दर्शकाचा "ओफ्" व तुफानी हंसणे त्याला वेगळ्याच (त्या) जगात घेऊन जाते. सासरघरची व माहेरची माणसं अखेर 'आपली' नसतात. ती त्या त्या घरचीच असतात हे ध्यानी येते. माणसांचे हे मजेशीर नमुने कानेटकरांनी मोठ्या कौशल्याने टिपले आहेत. नाट्यपूर्ण पद्धतीने सादर केले आहेत. तीन तास प्रेक्षक सारखे खदखदत असतात. ह्या नाटकात तसं (खास असं—संदेश—बोध वगैरे वगैरे) काही नाही, असं कानेटकर स्वतःच म्हणाले. (ते विनयाने नव्हे) खरंय् ते ! पण तरीही इथे बोध मिळतो. माणसांच्या सहवासात राह्यलो की एकूण मानवी जीवनाचाच अर्थ कळत जातो. इथले नमुने तुम्हाला बरंच काही शिकवून जातात. ह्या नाटकात प्रेक्षक व नट यांच्यातला पडदा काढण्याचा एक प्रयत्न केला आहे. त्या प्रयत्नाला पहिल्या प्रयोगाला मिळालेले प्रतिसाद (रिस्पॉन्सेस)ही मी पाहिले, ऐकले आणि पन्नासाव्या प्रयोगाचे वेळी मिळालेले प्रतिसादही पाहिले आहेत. त्यावरून हा प्रयोग ईप्सित साधून जातो असे मला वाटते. प्रेक्षक त्यामुळे शेवटपर्यंत सावध व रिस्पॉन्सिव्ह राहतो. त्यांची योजनाही कानेटकरांनी मोठ्या कौशल्याने केली आहे. स्वच्छतेचे वेड असलेली, फुलांचा ध्यास असलेली राणी आपल्याला भेटते. नवऱ्याचा स्वभाव वेगळा, मुळात रमणारा, त्यापायी घराची 'शान' विघडली तरी त्यातही आनंद मानणारा ह्या दोन व्यक्तित्वांच्या संघर्षातून व मूल नसण्याच्या खंतीतून हे नाट्य स्रवते. पण सतत हसवीत हसवीत शेवटी (डॉ. अष्टपुत्र्यांनाही न जुमानता, त्यांचा वैताग सहन करूनही) 'आम्हाला मूल होणार' ही वातमी 'होशियार' करून राजा-राणी प्रेक्षकांना सांगतात. शेवटच्या अंकातल्या साऱ्याच घटना मोठ्या मनोज्ञ—हळुवार हातानी लिहिलेल्या आहेत. घटिंगण गुरुजी "कुठेही नौकरी मिळाली नाही तर राजाला म्हणावं शाळेत ये" हे एकच वाक्य उच्चारतात. पण त्या माणसाची त्या घरावरची माया मनात (आपल्या) घर करून जाते. तसं काही खास नसूनही, नाटकाची सांकेतिक चौकट मोडलेली असूनही हे नाटक प्रेक्षकांना रिझविते. हंसविते. संगीताची (सिने) विडंबने त्याला आवडतात. गद्य काव्ये त्याला बरी वाटतात. पात्रांचे आपल्याशी होणारे बोलणे तो सहन करतो. अखेर लेकुरे उदंड होतात. प्रेक्षकांचा आनंदही उदंड होतो. वाढतो. पन्नासाव्या प्रयोगाच्या वेळी मी हे पुन्हा एकदा अनुभविले. रांगणेकर, कलावंत, जितेंद्र अभिषेकी आणि गोवा हिंदु असोसिएशन यांचे संयुक्त अभिनंदन !

प्रयोगशील प्रा. वसंत कानेटकरांचे खास अभिनंदन !!

## नवी (पण नक्खी नव्हे) "मत्स्यगंधा"

'मत्स्यगंधा' नाटकात एक चमत्कार घडला मंडळी ! मत्स्यगंधा हे नाटक मला फार आवडते. आशालता वाबगावकर ह्यांनी सादर केलेली 'मत्स्यगंधा' मी दोन तीनदा पाहिली आणि आता नव्याने रंगमंचावर आलेली 'मत्स्यगंधा'ही मी नुकतीच पाहिली! 'मत्स्यगंधा' नाटकाच्या ज्या जाहिराती त्या काळात आल्या त्यात कुठेही ह्या बदलाचे 'कौतुक' नव्हते. गाजावाजा नव्हता. अनेक प्रश्नचिन्हे मिरवीत मिरवीत माणसे पाहिली. दुसरा प्रयोग पाहून आली. आली तीच मुळी कौतुक करीत, गाजावाजा करीत, स्तुति करीत ! असे क्वचित घडते. तुलनेत नवा येणारा कलाकार हा नेहमीच कमी (कसा) आहे हे पाहण्याकडेच काकदृष्टि टीकाकार लक्ष देऊन असतात. पण आपल्या भूमिकेबद्दल ह्या व अशाच अनेकांना 'चांगले' म्हणायला लावणारी एक गुणी अभिनेत्री कुमारी सुनन्दा तोरगल यांच्या रूपाने लाभली आहे. 'मत्स्यगंधे'चे हे आव्हान (संभाजीप्रमाणेच) साधे नव्हते. ते संगीत—अभिनयाचे आव्हान होते. पुन्हा मागले काही लोकांच्या समोर होते. त्यापेक्षा अधिक नाही तरी निदान तिथपर्यंत तरी पोहोचणे आवश्यक होते. अभिनय—गाणे या साऱ्याच गोष्टींबाबत तुलना होणार








होती. (ती नाकारताही येणार नव्हती.) पण ही सारी आव्हाने ह्या गुणी मुलीने स्वीकारली. आणि हा 'चेंज-ओव्हर' जितक्या सहजतेने घडला तितक्याच सहजतेने तो पचला-रुजला-रुचलाही !

प्रयोगात कलावंतांनी एकमेकांना 'रिस्पॉन्सेस' देऊन एकमेकांची कला फुलवायची – सजवायची असते. पहिल्या अंकात पराशर 'देवाघरचे ज्ञात कुणाला' हे गाणे म्हणतो. त्यावेळी व तीर्थ शिंपडून तो तिला 'योजनगंधा' करतो त्यावेळचा सुनन्दा तोरगल यांचा अभिनय, रिस्पॉन्सेस अप्रतिम होते. मराठी नाटकात पुष्कळदा असे दिसते की, गाणारा नट गात असला की, दुसरी पात्रे जणु औरंगजेबाचेच आपण वंशज आहोत, आपला ह्या गाण्याशी काही संबंध नाही अशा थाटात मख्ख चेहरा करून उभी राहतात. पण मत्स्यगंधा–सत्यवती मात्र अधिक "रिस्पॉन्सिव्ह" आहे. तिचे लाजणे, तिचे स्मित, तिचा लाडिकपणा, तिचा खट्याळपणा, तिची वेदना, तिचा हट्ट–निग्रह, "सौदा" ही भूमिका घेतल्यानंतरचे तिचे दुखावलेले पण तरीही वरकरणी हसणारे, वरदत्त कौमार्याबद्दल खंती बाळगणारे अशा विविधरूपी भूमिका सुनन्दा तोरगल यांनी अतिशय प्रतिष्ठेने वठविल्या. त्यांना मुळातच प्रसन्न व्यक्तित्व लाभले आहे. मत्स्यगंधेने सौंदर्याचा गर्व बाळगला. ह्या मत्स्य-गंधेनेही तो बाळगावा अशी स्थिति आहे. कितीतरी ठिकाणी ती नवीन गोष्टी सादर करते, दाखविते. "स्वप्न रंगले रात्री, धुंद प्रेमि-कांचे" अशा ओळी ऐकताना ती जो 'स्वप्नाळू' (डोळ्यांचा) अभिनय करते तो मला आवडला. पहिल्या दोन अंकात तर ही मत्स्यगंधा सभागार जिंकते. तिसऱ्या अंकातल्या मत्स्यगंधेच्या रूपात ती 'फिट्' बसत नाही. तिची शेलाटी शरीरयष्टी, कोवळीक वयाने (व आघातांनी) थकलेली, स्वप्ने भंगलेली सत्यवती भासत नाही. ते बेअरिंग टिकविण्याचा ती आपल्या परीने प्रयत्न करते. पण 'शरीर' दगा देते असे वाटत राहते. अभिनयात 'शरीरा'ला किती महत्व असते हे जाणवावे. गाण्याच्या दृष्टीने तर हा सांधा बदल इतका अप्रतिम झाला आहे की पूछो मत ! ह्याही मुलाची आवाज गोड, बारीक, लवचिक आहे. गाणी जणुं जुनी मत्स्यगंधाच म्हणते आहे असे वाटावे (आता रेकॉर्ड तिच्या, गाणे हिचे असे दिसणार, इलाज नाही. नाटक कंपनीत "फुटणे" हा भाग मराठीत तरी नवीन नाही).

अशी ही गुणी अभिनेत्री गोवा हिंदु असोसिएशनला लाभली आहे. मत्स्यगंधेची भूमिका हे एक आव्हान होते. ते ह्या मुलीने स्वीकारले व अनेक नवे पैलू दाखवून सिद्ध केले ह्याबद्दल तिचे, संस्थेचे व तिला योग्य त्या ठिकाणी आणून पोहोचविणाऱ्या ज्ञात अज्ञात कलारसिकांचे मी अभिनंदन करतो.

"रायगड" आणि "मत्स्यगंधा" ह्या दोन्ही नाटकांबाबत परि-स्थितीने दिलेली कठिण आव्हाने स्वीकारून कलेचा झेंडा फडकत ठेवण्याची जिद्द बाळगणाऱ्या दि गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाशाखेचे मी अभिनंदन करतो.

## बापू तोच (पण "गारंबी" नाही)

**'गारंबीचा बापू'** हे नाटक पुरुषोत्तम वाळ यांनी रंगमंचावर आणले. कादंबरी समर्थ, गाजलेली. डॉ. काशीनाथ घाणेकर व उषा किरण यांची जोडी बापू–राधेच्या भूमिकांसाठी निवडलेली. त्यामुळे सुरवातीपासून अपेक्षा उंचावलेल्या. नाटक आले. गाजले. 'बापू'च्या भूमिकेत डॉ. घाणेकरांनी जीव ओतला. त्याचे सारे हर्षामर्ष त्यांनी 'सजीव' केले. आणि मग काहीतरी झाले (काय ते तेच जाणे) आणि ते बाहेर पडले. मग स्वतः बाळच 'बापू' झाले. पण मेळ जमला नाही खरा (पैशाचा की अभिनयाचा ?) नाटक बासनात गेले. पण ते नाटक तिथेही 'चळवळ' करीतच राहिले (बापूचेच नाटक ते–ते स्वस्थ कसे बसणार ?) आणि आता मोहन वाघांचा हात धरून ते नाटक पुन्हा (नव्या राधेसह) रंगमंचावर आले आहे. पुन्हा डॉ. काशीनाथ घाणेकर बापू झाले आहेत व 'मत्स्यगंधा' आशालता "राधा" झाल्या आहेत. नवे–पात्र शंकर घाणेकर– दिनकर भट हे आहे. नाट्य प्रयोगात लेखकाने काही नवे बदल केले आहेत. पण ते सारेच बदल स्वागतार्ह व परिणामकारक झाले आहेत असे नाही. कादंबरीचा शेवटचा अधिक तार्किकदृष्ट्या सुसंगत व राधा-बापूच्या जीवनातूनच "इव्हॉल्व्ह" झाल्यासारखा वाटतो. नाटकातल्या शेवटाने लेखकाला काय सुचवायचे आहे ? कादंबरीतला बापू जिंकतो नाटकात, तो सहानुभूति जिंकत नाही. असे कां ?

प्रयोग मात्र चांगला होतो. डॉ. घाणेकरांच्या भूमिकेबद्दल नव्याने काही लिहायला पाहिजे असे नाही. ती भूमिका जणु त्यांच्यासाठीच जन्मली असे वाटावे. आशालता वाबगावकर या तशा गुणी अभिनेत्री आहेत. त्यांनी उभी केलेली राधा तुलनेने तेवढी छाप पाडू शकली नसली तरी त्यांनी प्रयत्न मात्र कसोशीने केला असे म्हणावे लागेल. शंकर घाणेकर याचा दबदबा मोठा असला तरीही त्यांनी उभा केलेला दिनकर भटजी हा खटकतोच. तो त्यांनी इतर भूमिकांप्रमाणे-विनोदी–विदूषकी केला आहे. बापूवर जबर माया करणारा, त्याची बंडखोरी मनातून आवडलेला पण परंपराही सोडू न शकणारा, द्वंद्वात पडून गोंधळलेला दिनुभटजी घाणेकरांच्या जवळपासही फिरकत नाही (**"येथे सर्व भूमिका विनोदीच करून मिळतील"** ही घाणेकरांच्या घरावरील पाटी कदाचित दिग्दर्शकांनी वाचली नसावी) घाणेकर थोर अभिनेते आहेत. पण आता त्यांचा "ब्रँड" झाला आहे. ती कोंडी फोडण्याचा आग्रह कसा करता ? उषा सराफ (बापूची आई) यांचे मात्र खास अभिनंदन करतो. 'दिग्दर्शन' असे खास जाणवले नाही. मुख्यतः हे नाटक 'गारंबीत' घडते आहे ह्याचा खास प्रत्यय येत नाही ही आमची तक्रार आहे. असा बापू कुठेही होऊ शकतो. मग 'गारंबीचा बापू'च कशासाठी ? त्यात लेखकाने काही गृहित कृत्ये मनी धरली आहेतसे वाटते. मग ती रंगमंचावरही दिसायला नकोत काय ?

एक चांगले नाटक बासनातून काढून पुन्हा प्रकाशात आणले व पेंडशांना, बापूला (व मराठी प्रेक्षकांनाही) न्याय दिला ह्याबद्दल निर्माते मोहन वाघ यांचे अभिनंदन करतो. हा 'सजीव' बापू मराठी नाटकात मानाने जाऊन बसेल अशी खात्री वाटते.

**–चित्रगुप्त**

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment AUGUST 1967

DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY 4.